# बेगमांचे अश्रू

ख़्वाजा हसन निज़ामी

अनुवाद
भारती गोखले



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# प्रस्तावना

शमसुल उलेमा ख्वाजा हसन निज़ामी देहलवी यांचा जन्म 1880साली झाला. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर, 1955 साली त्यांचे निधन झाले. मी त्यांना माझ्या विद्यार्थी दशेत, तसेच त्यांच्या निधनापूर्वो काही महिने पाहिले होते. त्यांची वेशभूषा सदैव एकच असे. विटकरी रंगाचा लांब कुडता, फकिरांसारखा दुपट्टा, मशायखची टोपी (भारतात सूफी संत घालतात तसली विशिष्ट टोपी), लांब रुळणारे केस, चमकदार डोळे बोलण्याची छाप पाडणारी ढब आणि अतिशय मिठ्ठास वाणी.

ख्वाजा हसन निजामी यांनी पाचशेहून अधिक पुस्तके लिहिली असून ती उर्दू भाषा आणि शैलीत अजोड आहेत. दिल्लीच्या 'टकसाली' भाषेत लिहिलेली त्यांची छोटी वाक्ये, केवळ प्रभावी असतात एवढेच नव्हे तर डोळयांसमोर चित्र उभे करतात. त्यांच्या सहज, साध्या आणि प्रवाही भाषेमुळे च त्यांना 'मुसव्विरे फितरत' (निसर्गाचा चित्रकार) म्हटले जाते.

ख्वाजा हसन निजामी यांच्या शैलीवर अब्दुल हलीम 'शरर' (1860-1926) आणि मुहम्मद हुसेन आझाद (1830-1910) यांचा दाट प्रभाव दिसतो. त्यांच्या गद्य लेखनात बोली भाषेचा चटपटीतपणा आहे तसेच आपल्या भारतीय प्रकृतीची त्यांना जाण असल्याचेही दिसते. त्यांच्या शैलीत नर्म विनोदी रेशमी चिमटे, गुदगुल्या आहेत आणि काळजाला चटका लावणारे कारुण्यही आहे.

ख्वाजा हसन निजामी यांचे उर्दूचे शिक्षण पदच्युत शहजाद्यांबरोबर (राजकुमारांबरोबर) झाले होते. 1857 च्या बंडानंतर भारतात ब्रिटिशांची सत्ता आली त्यानंतर राजघराण्यातली बरीच माणसे हजरत निजामुद्दीन वस्ती आणि चेलन दिल्ली या भागात राहायला आली. या शहजाद्यांबरोबर बालपण गेल्यामुळे ख्वाजा हसन निजामी यांच्या मनात त्यांच्याविषयी नेहमीच आस्थेची आणि प्रेमाची भावना असे. या उध्वस्त कुटुंबांमधल्या लोकांना भेटून त्यांनी त्यांच्या हकिकतींवर आधारित अनेक पुस्तके लिहिली आणि ती देशभर लोकप्रीय झाली या सर्व पुस्तकात 'बेगमात के आँसू' हे पुस्तक सर्वांत प्रसिद्ध आहे. यात 1857 च्या बंडाच्या खऱ्याखुऱ्या हकिकती आहेत. त्यापैकी काही निवडक कथा या संग्रहात प्रविष्ट करण्यात आल्या आहेत.

मुल्ला वाहदी, ख्वाजा हसन निजामी यांच्याबद्दल एक कथा सांगतात. ते एकदा खूप आजारी पडले तेव्हा त्यांच्या आईने त्यांना एका फकिराकडे पाठवले. हा फकीर शेवटचे मोंगल सम्राट बहादुरशहा जफर यांचा जवळचा नातेवाईक होता. त्या वृद्ध फकिराने ख्वाजा हसन निजामी यांच्या गळयात 'नादे अली का नक्श' (हजरत अली यांच्या संकट मोचन मंत्राचा ताईत) बांधला. यावर त्यांची आई म्हणाली. "माझ्या मुलासाठी हिंदुस्तानच्या बादशहानी 'नादे अली का नक्श' दिला आहे." बादशहा म्हणतानाच आईच्या डोळयात पाणी आले. ते पाहून ख्वाजा साहेबांनी विचारले, "आई तुझ्या डोळयात पाणी का;" आई म्हणाली "बाळ, आता ते बादशहा नाहीत. इंग्रजांनी त्यांचं राज्य-वैभव सगळं हिरावून घेतलं."

या घटनेमुळे ख्वाजा साहेबांच्या मनात या पदच्युत शहजाद्यांसाठी तीव्र सहानुभूती निर्माण झाली. इतकी की 1922 मध्ये जेव्हा ते मदीनेला गेले तेव्हाही त्यांनी शहजाद्यांसाठी मुद्दाम प्रार्थना केली की "हे तिन्ही लोकांच्या स्वामी, मी दिल्लीच्या बरबाद झालेल्या शहजाद्यांचे गा-हाणे तुझ्या समोर मांडत आहे. त्यांना राज्याची, वैभवाची आशा नाही पण साधा भाकरीचा तुकडा आणि लाज झाकण्यापुरता जाडाभरडा कपडा देखील त्यांच्या नशिबात नाही. त्यांच्या दु:खाची आणि अपमानाची परिसीमा झाली आहे. आता तरी त्यांचे अपराध पोटात घालून त्यांना क्षमा कर."

1911 साली दिल्लीत दरबार भरला होता. त्यात हिंदू आणि मुसलमान पंडितांचाही एक कार्यक्रम होता. सम्राट पंचम जॉर्ज आपल्या महाराणीबरोबर लाल किल्ल्याच्या झरोक्यात बसले होते आणि खाली हिंदू आणि मुसलमान पंडित त्यांना आशीर्वाद देण्यासाठी जमले होते. ख्वाजा हसन निजामी यांनाही बोलावण्यात आले होते. पण ते घरीच रजई पांघरुन झोपून राहिले. त्यांचे म्हणणे, "जिथे शाहजहाँ आणि त्याच्या वारसांनी प्रजेला दर्शन दिले त्या जागेवर पंचम जॉर्जने बसावे हे माझ्यानं पाहावलं जाणार नाही. त्या दरबारापेक्षा ही रजई पांघरून झोपण्याचं सुखच कितीतरी जास्त आहे."

ही इंग्रजांच्या वेळची गोष्ट झाली. स्वातंत्र्यानंतर लाल किल्ल्यात पहिले जाहीर कवि-सम्मेलन झाले, तेव्हा पंडित कैफी यांना आमंत्रण पाठवण्यात आले यांना होते. त्यांनी साफ नकार दिला आणि ते म्हणाले की "त्या सर्वश्रेष्ठ किल्ल्याचा अनादर माझ्याच्याने बघवला जाणार नाही."

ख्वाजा हसन निज़ामी यांचे "बेगमात के आंसू" हे पुस्तक सर्व प्रथम गफ़े दिल्ली के अफसाने" (दिल्लीतल्या वैभवाच्या कथा) या नावाने प्रसिद्ध झाले होते आणि त्यावर कित्येकदा कायद्याने बंदी घालण्यात आली होती. या पुस्तकाच्या चौदा आवृत्या आतापर्यंत प्रसिद्ध झाल्या आहेत. या पुस्तकातले काही भाग रेडियोवरूनही प्रसारित झाले आहेत, काहींचा हिंदी आणि गुजराथीमध्ये अनुवादही करण्यात आला आहे

1857 च्या बंडाच्या वेळी दिल्लीच्या राजघराण्यावर काय काय संकटे ओढवली, त्या करूण घटनांचे वर्णन ख्वाजा हसन निज़ामी यांनी इतक्या हृदय स्पर्शी शैलीत केले आहे की वाचताना अश्रू अनावर होतात. बंडासंबंधीच्या या निवडक कथांचा संग्रह, नॅशनल बुक ट्रस्ट सारखी राजमान्य संस्था प्रकाशित करीत आहे. स्वतंत्र भारतात वाचक हा संग्रह अधिकच आस्थेने वाचतील अशी आशा आहे.

—ख्वाजा अहमद फारुकी

# अनुक्रमणिका

| क्रमांक | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| 1. | कुलसूम ज़मानी बेगम | 1 |
| 2. | गुलबानो | 9 |
| 3. | शहज़ादी | 14 |
| 4. | नरगिस नज़र | 22 |
| 5. | मह ज़माल | 29 |
| 6. | सकीना खानम | 38 |
| 7. | सब्ज़पोश | 46 |
| 8. | बहादुरशाह ज़फर | 49 |
| 9. | मिर्ज़ा नसीर-उल-मुल्क | 51 |
| 10. | मिर्ज़ा दिलदार शाह | 54 |
| 11. | मिर्ज़ा, कमर सूलतान | 56 |

# कुलसुम जमानी बेगम

एका अभागिनीच्या आयुष्यात नाशिबाच्या फे-यामुळे घडलेल्या या घटना आहेत. तिचे नाव कुलसुम जमानी बेगम. दिल्लीचे शेवटचे मोंगल सम्राट बहादुरशाह जफर यांची ती कन्या.

काही वर्षापूर्वीच ती मरण पावली. मी अनेकदा तिच्या तोंडून तिच्या आयुष्यातल्या अनेक घटना ऐकल्या आहेत. आमचे गुरू औलिया निजामुद्दिन यांच्यावर तिची फार श्रद्धा होती. त्यांच्या दर्शनासाठी ती अनेकदा येत असे, तेव्हा तिच्या करुण कहाण्या ऐकण्याची संधी मला अनेकदा मिळत असे. पुढे दिलेल्या घटनांपैकी काही तिने स्वतः, तर काही तिची कन्या जीनत जमानी बेगम यांनी सांगितलेल्या आहेत. जीनत जमानी बेगम अद्याप हयात असून पंडित गल्लीत राहतात. घटना त्या दोघींच्याच शब्दात देत आहे.

"माझ्या वडिलांची कारकीर्द संपुष्टात आली आणि राजवट लुटली जाण्याची वेळ जवळ येऊन ठेपली तेव्हा दिल्लीच्या लाल किल्ल्यात अंदाधुंदी माजली होती. सगळीकडे दुःखाची दाट छाया पसरली होती. शुभ्र संगमरवरी इमारती देखील काळयाकुट्ट भासत होत्या. आदल्या दिवशीपासून आम्ही काही खाल्ले नव्हते. जीनत तेव्हा दीड वर्षाची होती आणि पिण्याकरता मला वारंवार बिलगत होती. पण काळजी आणि दुःखामुळे माझे दूध पार आटून गेले होते. कुणा दाईचे दूध देणे देखील शक्य नव्हते. आम्ही सगळे असे उदासवाणे बसलो असताना बादशहाच्या अंतःपुरातला खास नोकर आम्हाला बोलवायला आला. मध्य-रात्रीची वेळ. सगळीकडे शुकशुकाट.त्यात तोफांच्या आवाजाने हृदयाचा नुसता थरकाप होत होता. तरीही बादशहांचा हुकूम मिळताच त्यांच्या भेटीसाठी आम्ही निघालो. बादशहा नमाज पढण्याच्या चटईवर बसले होते. हातात जपमाळ होती मी पुढे झाले आणि वाकून त्रिवार मुजरा केला, तेव्हा त्यांनी अतिशय प्रेमाने मला जवळ बोलावले आणि म्हणाले 'कुलसुम, तुला मी ईश्वराच्या हवाली केलं आहे. नशिबात असेल तर आपली पुन्हा भेट होईल. तू तुझ्या पतीबरोबर कुठेतरी निघून जा. मीही चाललो आहेच. या शेवटच्या क्षणी तुम्हा मुलांना नजरेआड करावं अशी अजिबात इच्छा नाही.पण काय करणार? माझ्या बरोबर राहिलात तर तुम्ही

बरबाद होईल अशी भीती वाटते. इथून दूर गेलात तर देवाच्या दयेनं कदाचित काही बरं होईलही.'

एवढे बोलून त्यांनी आपले वृद्ध, कापरे हात वर उचलले आणि उच्च स्वरात ईश्वराची करुणा भाकू लागले.

"परमेश्वरा, ही अनाथ मुलं तुझ्या हवाली करीत आहे. महालांमध्ये वाढलेली ही मुलं रानावनात चालली आहेत. या जगात त्यांना मदत करणारं कुणी उरलं नाही. तैमूरच्या नावाची लाज राख आणि या निराधार स्त्रियांची अब्रू वाचव. सर्व सृष्टीच्या पालनकर्त्या, केवळ हीच नव्हे, तर हिंदुस्थानातले सगळे हिंदू-मुसलमान माझीच लेकरं आहेत. ती सगळी सध्या संकटात आहेत. माझ्या कर्माची फळं त्यांना भोगायला लावू नकोस. दुःख निवारण कर."

नंतर त्यांनी माझ्या डोक्यावरुन हात फिरवला. जीनतला प्रेमाने कुरवाळले. माझे पती मिर्झा जियाउद्दिन यांना काही रत्ने दिली आणि आपली पत्नी नूरमहल हिलाही आमच्याबरोबर पाठवले.

उत्तर रात्री आम्ही किल्ल्यातून निघालो. दोन पुरुष आणि तीन स्त्रिया. माझे पती मिर्झा जियाउद्दीन आणि बादशहांचे मेहुणे मिर्झा उमर सुल्तान हे दोघे पुरुष आणि मी, नूर महल आणि बादशहांची विहीण हाफिज सुल्तान अशा तिघी बायका. आम्ही रथात बसलो तेव्हा पहाट होत होती. सगळया चांदण्या विझल्या होत्या. केवळ शुक्राची चांदणी चमचमत होती. मी आपल्या भरल्या घरावर आणि इतर महालांवर शेवटची नजर टाकली आणि माझ्या हृदयात कालवाकालव झाली. डोळे भरुन आले. नूर महलचे डोळेही पाण्याने डबडबले होते. शुक्राच्या चांदणीचे प्रतिबिंब तिच्या भरल्या डोळयांमध्ये तरळत होते.

अखेर लाल किल्ल्याचा शेवटचा निरोप घेऊन आम्ही कोराली नावाच्या गावात पोहोचलो आणि आमचा रथ हाकणा-या सारथ्याच्या घरी उतरलो. जेवणाकरता त्याने बाजरीची भाकरी आणि ताक दिले. इतकी भूक लागली होती की ते पदार्थ बिर्याणीपेक्षाही चविष्ट लागले. एक दिवस तर ठीक पार पडला. पण दुस--याच दिवशी आसपासच्या गावातले जाट आणि गुजर, कोराली गावात लुटालूट करायला आले. त्याच्यात शेकडो बायकाही होत्या. हडळींसारख्या त्या आमच्या अंगाला झोंबल्या. त्या किळसवाण्या बायका आपल्या जाड जाड घाणेरडया हातांनी आमचे गळे ओरबाडत असताना त्यांच्या घाग-यांची, कपडयांची इतकी घाण येत होती की जीव घाबरा होत होता. सगळे दाग-दागिने, कपडे ते लोक लुटून घेऊन गेले.

त्यानंतर आमच्याजवळ एकवेळच्या जेवणापुरतेही काही उरले नाही. आता आणखी काय होणार आहे याच चिंतेत आम्ही होतो. जीनत तहानेने व्याकूळ होऊन रडत होती. समोरून एक जमीनदार जात होता. लाचार होऊन मी त्याला म्हटले 'भाऊ, थोडे पाणी या मुलीला आणून दे रे' ; त्याने ताबडतोब मातीच्या एका बाडग्यात पाणी आणले आणि तो म्हणाला 'आजपासून तू माझी बहीण आणि मी तुझा भाऊ.' हा जमीनदार कोराली गावचा राहणारा होता. खाऊन पिऊन सुखी असलेल्या त्या इसमाचे नाव होते बस्ती. त्याने आपली बैलगाडी तयार केली आणि तिच्यात आम्हा सर्वांना बसवून म्हटले, 'तुम्हाला जिथे जायचे असेल तिथे मी नेऊन सोडतो.' आम्ही म्हटले, 'मेरठ जिल्ह्यात अजारा गावी, मीर फैज अली नावाचे शाही हकीम (राजवैद्य) राहतात. त्यांचे आमच्या घराण्याशी फार चांगले संबंध आहेत. त्यांच्या घरी घेऊन चल.' बस्ती आम्हाला अजारा गावी घेऊन गेला. परन्तु मीर फैज अलींनी आम्हाला कमालीची वाईट वागणूक दिली. 'तुम्हा मंडळींना ठेवून घेऊन माझे घर मला बरबाद करायचे नाही', असे म्हणून साफ कानावर हात ठेवले. (मीर फैज अलीच्या मुलांनी हे पुस्तक वाचल्यावर मला सांगितले, की बेगम साहिबांचे म्हणणे बरोबर नाही. मीर फैज अलींनी त्यांना सर्वांना ठेवून घेतले होते आणि मदतही केली होती.)

ती वेळच हताश होण्याची होती. एक तर इंग्रजांचे सैन्य पाठलाग करीत असेल ही भीती. त्यात आमच्या दुर्दैवाने जो तो आम्हाला टाळत होता. आमच्या नजरेच्या इशाऱ्यांवर नाचणारे लोकच आज आमचे तोंड पहायला तयार नव्हते. धन्य त्या बस्ती जमीनदाराची. आपल्या मानलेल्या बहिणीची त्याने शेवटपर्यंत सोबत केली. नाइलाजाने आम्ही अजाऱ्याहून निघालो आणि हैदराबादच्या वाटेला लागलो. आम्ही बायका बस्तीच्या बैलगाडीत बसलो होतो आणि पुरुष पायी चालले होते. तिसऱ्या दिवशी आम्ही एका नदीच्या काठी पोहोचलो. तिथे कोयलच्या नवाबांच्या सैन्याचा तळ पडला होता. आम्ही राजघराण्यातली माणसं आहोत हे कळताच त्यांनी आमचे खूप आदरातिथ्य केले आणि हत्तीवर बसवून नदीच्या पैलतीरावर पोहोचवले. आम्ही पैलतीरी पोहोचलो. इतक्यात समोरुन सैन्य आले आणि नवाबाचे त्या सैन्याशी युद्ध सुरू झाले.

माझ्या पतींची आणि मिर्झा उमर सुलतानांचीही नवाबाच्या सैन्याच्या बाजूने लढण्याची इच्छा होती. पण रिसालदाराने (घोडदळाच्या प्रमुखाने) निरोप पाठवला की 'जे काही होईल ते आम्ही आमचे पाहून घेऊ. तुम्ही बायकांना घेऊन ताबडतोब इथून निघून जा.' समोर शेतांमध्ये तयार पिके उभी होती.

आम्ही त्यात लपलो. शत्रूने आम्हाला पाहिले की चुकून गोळी या बाजूला उडाली काही कळले नाही, पण एक गोळी शेतात आली आणि तिने आग भडकली. सगळे शेत जळायला लागले. आम्ही पळायला सुरूवात केली. पण नशीब तरी असे की आम्हाला पळता देखील येत नव्हते. गवतात अडकून आम्ही वारंवार पडत होतो डोक्यावरच्या चादरीही तिथेच गळून पडल्या. उघडया डोक्याने, महाकष्टाने, कसेबसे शेताच्या बाहेर आलो. माझे आणि नूरमहलचे पाय रक्तबंबाळ झाले होते. तहानेने प्राण कंठाशी आले होते. जीनत वारंवार बेशुद्ध पडत होती. पुरुष आम्हाला सावरायचा प्रयत्न करत होते पण आम्ही सावरणे कठीण होते.

नूर महलला शेताबाहेर पडताच घेरी आली आणि ती बेशुद्ध पडली. मी जीनतला उराशी कवटाळून माझ्या पतीच्या चेह-याकडे पहात होते आणि मनातल्या मनात म्हणत होते, 'अल्ला, आम्ही कुठे जावं ? कुठेच आसरा दिसत नाही. नशीब असे कसे फिरले की आम्ही राजाचे भणंग फकिर झालो ! फकिरांना निदान शांती, निश्चिंतपणा तरी असतो. इथे तेही नशिबात नाही.'

सैन्य युद्ध करीत दूर निघून गेले. बस्ती नदीतून पाणी घेऊन आला. आम्ही पाणी प्यालो आणि नूर महलच्याही चेह-यावर पाणी शिंपडले, ती शुद्धीवर येताच रडायला लागले. रडता रडता सांगायला लागली, 'कुलसुम, आताच मी तुझ्या वडिलांना स्वप्नात पाहिलं. त्यांना साखळदंडांनी बांधलं होतं. ते म्हणाले 'आज आम्हा गरिबांना काटयाकुटयांनी भरलेला हा राखेचा बिछानाच मखमली शय्येपेक्षा श्रेष्ठ आहे. नूरमहल घाबरु नकोस. धीराने वाग. म्हातारपणी हा जुलूम सहन करणंच नशिबात लिहिलं होतं. कुलसुम कुठे आहे ? तरुंगात जाण्या पूर्वी तिला बघावंसं वाटतं.'

हे ऐकून मी फार व्याकुळ झाले. मनात आले, 'खरोखरच बादशहांना साखळदंडांनी बांधून ठेवलं असेल का ? खरोखरच त्यांना कैद्यासारखं तुरुंगात पाठवलं असेल का?' मिर्झा उमर सुलतान म्हणाले, 'हा नुसता भ्रम आहे. राजे लोक दुस-या राजांना अशी वाईट वागणूक देत नाहीत. तुम्ही घाबरु नका. ते ठीक असतील'. बादशहांची विहीण, हाफिज सुलतान म्हणाली 'हे मेले फिरंगी बादशहांचा काय आदर राखणार ? स्वत:च्या बादशहांचं डोकं कापून सोळा आण्यात विकणारे हे लोक' (जुन्या नाण्यांवर इंग्लंडच्या राजाच्या शिराची मुद्रा असे, त्याला हा टोमणा आहे.-लेखक) ती पुढे म्हणाली 'नूर महल, तू तर त्यांना साखळदंडांनी बांधलेलेच पाहिलेस. मी तर म्हणते हे लोक या पेक्षाही वाईट वागणूक द्यायला

कमी करणार नाहीत'. परंतु माझे पती मिर्जा जियाउद्दीन यांनी चार धीराच्या गोष्टी सांगून सर्वांचे मन शांत केले.

इतक्यात बस्ती नावेतून बैलगाडी घेऊन या तीरावर आला आणि आम्ही सगळे निघालो थोडयाच वेळात संध्याकाळ झाली आणि आम्ही एका गावात मुक्काम केला. या गावात मुसलमान राजपुतांची वस्ती होती. त्यांच्या प्रमुखाने आम्हाला एक घर रिकामे करून दिले. त्यात वाळल्या गवताचे आणि चा-याचे बिछाने होते. त्या गवताला प्याल किंवा पराल म्हणतात. ते लोक याच गवतावर झोपतात. त्यांनी आपल्या परीने आदरातिथ्य करून तसेच बिछाने आम्हालाही दिले.

त्या कच-याने माझा जीव घाबरा व्हायला लागला. पण काय करणार ? त्यावेळी दुसरी कोणती सोय करणे शक्य होते ? नाइलाजाने त्यावरच सगळे निजलो. दिवसभर त्रास आणि दगदग सहन केल्यानंतर जिवाला जरा स्वस्थता, आराम मिळाला होता. त्यामुळे ताबडतोब झोप आली.

मध्यरात्री आम्हा सर्वांची झोप मोडली. वाळके गवत सुयासारखे अंगाला बोचत होते. त्यात पिसवाही चावत होत्या. काय हाल झाले ते देवच जाणे. मखमली उशा आणि मऊ रेशमी बिछान्यांची सवय होती म्हणून त्रास झाला. नाहीतर गावातली माणसे त्याच गवतावर गाढ झोपली होती. त्या काळोख्या रात्री चहू बाजूंनी कोल्हेकुई ऐकू येत होती आणि माझ्या हृदयाचा थरकाप होत होता. नशीब फिरायला वेळ नाही लागत. नाहीतर भारताच्या बादशहाच्या मुलांना अशा गवताच्या गादीवर झोपावे लागेल असे कुणाला तरी वाटले असते का ? असेच ठायी-ठायी नशिबाचे खेळ बघत हैदराबादला पोहोचलो आणि सीताराम पेठेत एका भाडयाच्या घरात राहायला लागलो. लूटमारीतून बचलेली एक रत्नजडित अंगठी माझ्या पतींनी जबलपूर मध्ये विकली. मिळालेल्या पैशातून प्रवासाचा खर्च भागला आणि काही दिवस हैदराबादमध्येही त्यावर गुजराण झाली. पण शेवटी तेही पैसे संपले. आता पोट जाळण्याकरता काय करायचे हा प्रश्न उभा राहिला. माझे पती उच्च दर्जाचे 'खुशनवीस' (लिपिक-उत्तम अक्षर काढू शकणारे) होते. त्यांनी हजरत मुहम्मद आणि त्यांच्या कुटुंबियांचे गुणवर्णन वेलबुट्टी काढून सुंदर अक्षरात लिहिले आणि चार मिनारवर विकायला घेऊन गेले. लोक त्याकडे बघत आणि आश्चर्याने आ वासून बघतच राहत. पहिल्या दिवशी पाच रुपये मिळाले. पुढे पुढे ते जे काही लिहीत ते ताबडतोब खपत असे. अशा

रितीने आमची गुजराण चांगली होत होती. पण मूसा नदीच्या पुराच्या भीतीने शहरात ठाणेदार अहमदच्या घरी राहायला आलो. हा ठाणेदार निजामाचा खास नोकर होता. त्याने त्याची बरीच घरे भाड्याने दिली होती.

नवाब लष्कर जंग यांनी काही शहजाद्यांना आश्रय दिला होता. एक दिवस बातमी आली की नवाब लष्कर जंगांवर इंग्रजांचा रोष उत्पन्न झाला असून, यापुढे कुणीही माणूस दिल्लीच्या राजघराण्यातल्या लोकांना आश्रय देणार नाही, उलट कुणाला अशा शहजाद्याचा ठावठिकाणा कळला तर तो त्याला पकडून देईल. या बातमीने आम्ही सगळेच घाबरलो. कुठे माझ्या पतीला कोणी पकडेल या भीतीने त्यांनाही बाहेर जायची मी मनाई केली, पण पुन्हा उपास घडायला लागले, तेंव्हा नाइलाजाने एका नवाबाच्या मुलाला कुराण शिकवण्याचे काम त्यांनी स्वीकारले. त्याचे दरमहा बारा रुपये मिळत असत पण तो नवाब इतका वाईट स्वभावाचा होता की माझ्या पतीला तो इतर नोकरांसारखाच वागवत असे. माझ्या पतीला ते सहन होत नसे. ते रडून ईश्वराची करुणा भाकत असत 'अल्ला, या अपमानास्पद नोकरीपेक्षा मरण लाख परवडलं. आम्हाला इतकं लाचार बनवलंस. कालपर्यंत त्याच्यासारखे नवाब आमचे गुलाम होते आणि आज आम्ही त्यांचे गुलाम आहोत' दरम्यान कुणीतरी मियाँ निजामुद्दिन यांना आमच्याबद्दल सांगितले. मियाँ निजामुद्दिन यांना हैदराबादमधे फार मान होता. त्यांचे वडील कालेमियाँ साहिब चिश्ती निजामी फखरी यांना दिल्लीचे बादशहा तसेच निजाम आपले धर्मगुरु मानत असत. मियाँ आम्हाला भेटायला रात्रीच्या वेळी आले. आम्हाला पाहून त्यांना रडू कोसळले. एक काळ असा होता की ते किल्ल्यात आले की त्यांना सोन्याच्या वेलबुट्टीचे आसन बसण्यासाठी देण्यात येई. बादशहाची बेगम दासीं-सारखी स्वतः सेवा करीत असे. तेच आज घरी आले तर त्यांना बसायला देण्या-साठी फाटके गोणपाटही नव्हते. सगळा भूतकाळ पुन्हा डोळ्यासमोरून सरकला. दैवाची लीला-काय होते आणि काय झाले. मियाँ बराच वेळ आमची चौकशी करून निघून गेले. सकाळी त्यांचा निरोप आला की 'मी खर्चाची व्यवस्था केली आहे, तुम्ही हज यात्रेची तयारी करा.' हे ऐकताच आम्हा सगळ्यांनाच विलक्षण आनंद झाला आणि आम्ही यात्रेच्या तयारीला लागलो. थोडक्यात सांगायचे तर आम्ही हैदराबादहून मुंबईला आलो. तिथे आमचा सच्चा मित्र बस्ती याला काही पैसे देऊन निरोप दिला. आम्ही जहाजात बसलो. आम्ही राजघराण्यातले आहोत हे कळताच प्रवासी आम्हाला उत्सुकतेने बघायला येत. आम्ही सगळे फकिरांच्या वेशात होतो. प्रवाशामध्ये एक हिंदू दुकानदार होता. त्याचे बहुधा एडन मधे

दुकान होते. त्याला आमच्याबद्दल काहीच माहिती नव्हती. त्याने विचारले 'तुम्ही कोणत्या पंथाचे फकीर आहात ?' त्याच्या या प्रश्नाने जणू आमच्या जखमांवर मीठ चोळले गेले. मी म्हणाले 'आम्हा पीडितांचा गुरु शहा आहे. तोच आमचा बापही होता. तोच आमचा गुरुही. पापी लोकांनी त्याची आणि आमची ताटातूट केली, त्याचे घरदार लुटले आणि त्याला देशोधडीला लावले. ते आम्हाला बघायला व्याकुळ असतात. आम्ही त्यांच्या दर्शना करता व्याकुळ आहोत.'

या शिवाय आपल्या फकिरी वृत्तीबद्दल आणखी काय सांगावे ? जेव्हा त्याला आमची खरी हकिगत लोकांकडून कळली तेव्हा त्याला रडू आले. तो म्हणाला 'बहादुरशहा आमचा सगळयांचा बाप आणि गुरु होता. काय करणार! त्या निष्पाप माणसाचे असे हाल व्हावेत असं प्रभू रामचंद्राच्याच मनात होतं की काय कुणास ठाऊक !

मक्केला पोहोचलो तेव्हा देवाने आमची काही वेगळीच सोय लावून ठेवली होती. अब्दुल कादिर नावाचा माझा एक गुलाम होता. त्याला मी गुलामगिरीतून मुक्त करून मक्केला पाठवले होते . इथे येऊन त्याने पुष्कळ पैसा कमावला आणि जमजमचा (मक्केतील पवित्र जलकुंड) तो व्यवस्थापकही बनला. त्याला आमच्या येण्याची बातमी कळताच तो धावतच आला आणि पायावर लोळण घेऊन धाय मोकलून रडू लागला. त्याचे घर फार चांगले आणि प्रशस्त होते. आम्ही तिथेच उतरलो. काही दिवसांनी रोमच्या सुल्तानाच्या मक्केमधल्या प्रतिनिधीला आमची माहिती कळली. कुणी तरी त्याला सांगितले की दिल्लीच्या बादशहाची मुलगी आली असून ती पडद्याचा (बुरख्याचा) रिवाज न पाळता भेटते. त्याने अब्दुल कादिरच्या मार्फत भेटीची इच्छा व्यक्त केली तेव्हा मी संमती दिली.

दुस-या दिवशी तो भेटायला आला. तो अतिशय अदबीने बोलत होता. शेवटी आमच्या आगमनाविषयी आपल्या सुलतान साहेबांना कळवण्याची इच्छा त्याने व्यक्त केली. मी म्हणाले 'आम्ही सर्वश्रेष्ठ सुलतानाच्या दरबारात आलो आहोत.आता इतर कुठल्या सुलतानाची आम्हाला पर्वा नाही.'नंतर त्याने आमच्या खर्चाकरता भरघोस रक्कम मंजूर केली आणि आम्ही नऊ वर्षे तिथेच राहिलो. नंतर एक एक वर्ष बगदाद नजफ अशरफ आणि करबऱ्यात राहिलो, मग मात्र दिल्लीच्या आठवणीने चैन पडेना म्हणून दिल्लीला परत आलो. इथे इंग्रज सरकारने फार उदार होऊन दहा रुपये महिना पेन्शन मंजूर केली होती! ही रक्कम ऐकून प्रथम तर मला हसूच आले. वाटले, माझ्या वडिलांचा एवढा मोठा प्रदेश

ताब्यात घेऊन त्याचा दहा रुपये मोबदला देत आहेत ! पण नंतर विचार आला प्रदेश कुणाच्या बापाचा नाही, देवाचा आहे. त्याला वाटेल त्याच्या तो हवाली करतो, वाटेल त्याच्या हातून काढून घेतो. माणसाची तर स्वतःच्या श्वासावरही मालकी नसते.

# गुलबानो

गुलबानो पंधरा वर्षाची झाली. अंगोपांगी तारुण्य मुसमुसायला लागले. तिचे वडील मिर्झा दाराबख्त बहादुर, बादशहा बहादुरशहा जफर यांचे पुत्र. बापाने लेकीला खूप लाडात वाढवले. वडिलांच्या मृत्यूनंतर गुलबानोची तैनात जास्तच वाढली. तिच्या आईचे म्हणणे, 'लहान वयातच पितृवियोग सहन करावा लागला आहे. सुकून जाईल माझी पोर. हिला वडिलांची आठवण देखील येणार नाही इतके हिचे लाड करा.'

आजोबा, म्हणजे बादशहा बहादुरशहा जफर देखील नातीच्या कौतुकात काही कमी पडू देत नसत. नवाब जीनत महल त्यांची लाडकी, खास मर्जीतली राणी. तिचा मुलगा जवाबख्त. मिर्झा दाराबख्त (गुलबानोचे वडील) अकाली मरण पावल्यामुळे युवराज पद मिर्झा फखरुला मिळाले असले तरी जवाबख्त वरच्या बादशहाच्या प्रेमापुढे युवराज मिर्झा फखरूचे काही एक चालत नसे. जीनत महलदेखील जवाबख्तला युवराजपद मिळावे म्हणून इंग्रजांशी सधान साधून गुप्त कारवाया करीत होती. जवाबख्तचे लग्नही इतक्या धूमधडाक्यात झाले की मोगल साम्राज्याच्या शेवटच्या काळातल्या कुठल्याही समारंभाशी त्याची तुलना करता यायची नाही. त्याच्या लग्नात गालिब आणि जौक सारख्या प्रसिद्ध शायरांनी सेहरे (वधुवरांना अभिष्टचिंतन करणारी काव्ये) लिहिले. त्या सेह-यांचा उल्लेख प्रसिद्ध विद्वान आझाद देहल्ली यांच्या 'आबेहयात' पुस्तकातही आहे.

थोडक्यात, बादशहाची जवाबख्त आणि त्याची आई जीनत महल यांच्यावर जितकी मर्जी होती तितकी कुणावरच नव्हती. पण गुलबानोची गोष्टच निराळी. बादशहाची या पोरक्या पोरीवर जितकी माया होती तितकी जवाबख्त आणि त्याच्या आईलाही कधी लाभली नाही. यावरूनच गुलबानो किती थाटात आणि ऐषआरामात राहत असेल त्याची कल्पना येईल. तशी मिर्झा दाराबख्तची आणखीही मुले होती, परंतु गुलबानो आणि तिच्या आईवर बादशहाची खास मर्जी होती.

गुलबानोची आई डोंब जमातीतली होती. तिच्या नव-याचे, मिर्झा दाराबख्तचे तिच्यावर आपल्या इतर बायकांपेक्षा सर्वात जास्त प्रेम होते. मिर्झा

दाराबख्त वारले तेव्हा गुलबानो बारा वर्षाची होती. हजरत मखदूम नसीरुद्दीन यांच्या चिराग दिल्ली इथल्या दरग्यात मिर्झा दाराबख्त यांना दफन करण्यात आले. ही जागा दिल्ली शहरापासून सहा मैल दूर आहे. गुलबानो कित्येक महिने आपल्या आईबरोबर पित्याच्या कबरीचे दर्शन घ्यायला जात असे आणि कबरीवर पडून रडत म्हणत असे "अब्बा, मलाही तुमच्याजवळ झोपवा. मला तुमच्या शिवाय भीती वाटते."

गुलबानो पंधरा वर्षाची झाली तेव्हा तारुण्याबरोबर बालवयातला हट्टीपणा आणि दांडगाई गेली, पण खटयाळपणा इतका वाढला की, महालातले प्रत्येक मूल तिच्या खटयाळपणाने गांजून जात असे. सोन्याच्या छपरी पलंगावर शाल पांघरून ती निजत असे. संध्याकाळ झाली दिवेलागण झाली की ती आपल्या छपरी पलंगावर जाऊन झोपत असे. तिची आई म्हणायची "इकडे दिव्याची वात पेटली की तिकडे आमची लाडूबाई पलंगावर चढलीच." यावर गुलबानो आळोखे देत, जांभया देत, विस्कटलेले केस मागे सारत म्हणत असे "त्यात काय बिघडलं ? मी झोपून माझा वेळ घालवते, तुझं काय जातं ? तू उगीचच माझ्यावर आग पाखडतेस." आई म्हणायची, "बानो, मी आग पाखडत नाही. खुशाल आराम कर. परमेश्वर तुला नेहमी सुखाची झोप देवो. पण मी म्हणते जास्त झोप माणसाच्या प्रकृतीला चांगली नाही. तू रात्री लौकर झोपतेस तर निदान सकाळी तरी लौकर उठाव. पण तू तर उन्हं वर आली तरी दहा-दहा वाजेपर्यंत झोपलेली असतेस. तुझी झोपमोड होईल या भीतीनं दासी आपसात बोलू देखील शकत नाहीत. इतकं काय झोपायचं ते ! घरातलं थोडं काम तरी करीत जा. आता तू मोठी झालीस. उद्या दुस-याच्या घरी जाशील. तुझ्या या अशाच सवयी राहिल्या तर तुझं पुढे कसं होणार ?"

आईचे हे व्याख्यान ऐकून गुलबानो नाराज होऊन म्हणायची "सारखं काय गं आई तेच तेच ! जा, माझ्याशी नको बोलू. मी तुला जड झाली असेन तर स्पष्ट सांग. मी आजोबाकडे (बादशहाजवळ) जाऊन राहीन."

त्याच दिवसात शहजादा खिजर सुलतानचा मुलगा मिर्झा दावर शिकोह गुलबानोकडे वारंवार येऊ लागला. किल्ल्यात राहणा-या राजघराण्यातल्या लोकांमधे आपसात पडदा करण्याची प्रथा नव्हती. त्यामुळे मिर्झा दावर शिकोहचे थेट येणे-जाणे होते.

सुरुवातीला तर गुलबानो, त्याची बहीण आणि तो तिचा भाऊ म्हणवला

जात असे—थोरल्या आणि धाकटया भावाची दोन मुले म्हणून. परंतु पुढे या नात्याने काही निराळेच वळण घेतले. मिर्झा तरुण गुलबानोकडे वेगळयाच दृष्टीने पाहू लागला, तर गुलबानोच्या मनातही मिर्झाबद्दल काही वेगळयाच भावना उत्पन्न होऊ लागल्या.

एक दिवस सकाळी मिर्झा गुलबानोकडे आला, तर गुलबानो सोन्याच्या पलंगावर रेशमी शय्येवर शाल पांघरून गाढ झापलेली त्याला दिसली. ती इतकी गाढ झोपली होती की तिची उशी बाजूला पडली होती, तोंड उघडे पडले होते, पण कशाचेच तिला भान नव्हते. दोन दासी तिच्या अंगावरच्या माशा बाजूला सारीत होत्या.

मिर्झा दावर शिकोह, आपल्या काकूजवळ, म्हणजेच गुलबानोच्या आई जवळ बसून गप्पा मारु लागला पण त्याची नजर वारंवार गाढ झोपलेल्या गुलबानोकडे जात होती. शेवटी न राहवून तो म्हणाला, "काकू, बानो इतका वेळ झोपते ? उन्हं वर आली, आता तरी तिला उठवा." काकू म्हणाली "अरे बाबा, बानोचा स्वभाव तुला ठाऊक नाही का ? तिला उठवायची कुणाला हिम्मत आहे ? घर डोक्यावर घेईल." दावर म्हणाला, "मी उठवतो तिला. पाहू तर खरी काय करते !" काकू हसून म्हणाली "उठव. तुला ती काही म्हणायची नाही. तुला फार मानते ना ती." दावरने जाऊन बानोच्या तळपायाला गुदगुल्या केल्या. बानोने पाय जवळ घेतले आणि आळस देत डोळे उघडून रागारागाने पायाच्या दिशेने पाहिले. तिला वाटले असेल कुणा दासीचा द्वाडपणा. या आगाऊपणाची तिला चांगली शिक्षा केली पाहिजे. पण तिने समोर तिच्या हृदयाच्याच राजाला पाहिले तेव्हा तिने लाजेने शाल अंगभर ओढून घेतली आणि उठून बसली. तिचे हे बेहोष करणारे विभ्रम दावरने डोळे भरून पाहिले. मग तो म्हणाला, "काकू, पहा मी बानोला उठवले."

त्या दोघांमधले प्रेम दिवसेंदिवस वाढत चालले. परंतु जेव्हा त्याच्या विरहात बानोची झोप उडू लागली तेव्हा तिच्या आईला संशय आला आणि तिने दावर शिकोहचे येणे-जाणे बंद करुन टाकले.

चिराग दिल्लीच्या दरग्याच्या एका कोप-यात रात्रीच्या वेळी एक सुंदर स्त्री, फाटके कांबळे ओढून तळमळत पडली होती. हिवाळयाचे दिवस होते.तशात मुसळधार पाऊस पडत होता. सोसाटयाच्या वा-याने बरेचदा पाऊस आतपर्यंत येत होता आणि तिचे अंथरुण पावसाने भिजत होते.

ती स्त्री अतिशय आजारी होती. तापाने तिचे अंग जळत होते. तिच्या फासळयांमधे अतिशय दुखत होते. आणि ती तापामुळे भ्रमात बडबडत होती, "गुलबदन, अग ए गुलबदन, कुठे जळली मेली ! अग लौकर ये, मला शाल पांघर. बघ पाऊस आत येतो आहे, पडदे खाली सोड, रोशन तूच ये. ही गुलबदन कुठे गेली आहे कुणास ठाऊक. हे बघ माझ्या जवळ शेगडी ठेवून मला शेक दे. माझ्या पाठीवर तेलाचे मालिश कर. अग आई ग, या दुखण्यानं माझा श्वास कोंडतोय् ग."

पण इतके बोलूनही जेव्हा कुणीच तिच्याजवळ आले नाही, तेव्हा तिने तोंडावरुन कांबळे दूर करून सगळीकडे नजर टाकली. ती एका अंधाऱ्या ओसरीवर राखेच्या बिछान्यावर झोपली होती. पाऊस सतत कोसळत होता. वीज चमकली की त्या प्रकाशात एक पांढरी कबर दिसत असे. ती तिच्या बापाची कबर होती.

हे सर्व पाहून ती जोरात किंचाळली आणि म्हणाली "बाबा, मी तुमची गुलबानो आहे. मी एकटी आहे. हो पहा, मला ताप आला आहे. माझ्या फासळयांमधे फार दुखतं आहे. मला फार थंडी वाजत्येय्. या फाटक्या कांबळया-शिवाय माझ्याजवळ पांघरायला काही नाही. माझ्या आईची आणि माझी ताटातूट झाली आहे. मला महालातून हाकलून दिलंय्. बाबा आपल्या कबरीत मला घ्या. मला भीती वाटते हो. बाबा कबरीतून डोकं वर काढा आणि मला पहा. मला परवापासून काही खायला नाही मिळाल. या ओल्या जमिनीतले खडे मला बोचतायत् मी विटेवर डोकं ठेवून झोपले आहे. माझा छपरी पलंग कुठे गेला ? माझी शाल कुठाय् ? माझी रेशमी गादी कुठे गेली ? बाबा, बाबा उठा ना. किती वेळ झोपाल ? आई ग, इतकं दुखतंय्. श्वास तरी कशी घेऊ !"

असे म्हणत असतानाच तिची शुद्ध काहीशी हरपली तिला वाटले की ती मेली आहे आणि तिचे वडील मिर्झा दाराबख्त तिला कबरीत ठेवत आहेत आणि रडत रडत म्हणत आहेत, "हाच या बिचारीचा राखेचा बिछाना."

तिला पुन्हा शुद्ध आली. तिने डोळे उघडले आणि ती टाचा घासू लागली. तिची मृत्यूची घटका जवळ आली होती. ती म्हणत होती, "आता निघाले मी. कोण मला पाणी देईल? कोण मला या शेवटच्या घटकेला यासीन[1] वाचून दाखवेल. कोण आपल्या मांडीवर माझे डोके घेईल ?अल्ला, तुझ्याशिवाय माझे कुणी नाही. तूच माझा आसरा, तुझा सवाच[2] माझा रक्षणकर्ता आणि या दरग्याचा पुण्यात्माच माझा साथीदार."

शहजादी गुलबानो मरण पावली. दुसऱ्या दिवशी गरिबांच्या कबरस्तानात तिचे दफन करण्यात आले. तोच आता तिचा अनंत काळपर्यंतचा बिछाना. कयामतच्या क्षणापर्यंत आता ती तेथेच झोपून राहणार आहे.

१. यासीन-पवित्र कुराणाचा एक भाग. एखाद्या व्यक्तीची मृत्यूघटिका जवळ आली म्हणजे याचे वाचन केले जाते.

२. अल्लाचा सखा-महंमद पैगंबर.

# शहजादी

त्या घराच्या भिंती कच्च्या बांधणीच्या होत्या. त्यांचा काही भाग पावसात ढासळला होता. दरवाज्यावर फाटक्या गोणपाटाचा पडदा लावलेला होता. मी हाक मारल्यावर एक म्हातारी दासी बाहेर आली आणि शहजादी (राजकुमारी) साहेबांनी मला आत बोलावले.

त्या घराचे अंगणही फार लहानसे होते. दोन खाटा मोठया मुश्किलीने मावतील इतके लहान. ओसरी तर इतकी लहान होती की दोन चारपाया देखील तिथे ठेवता आल्या नसत्या. ओसरीच्या उत्तरेच्या बाजूला एक लहानशी खोलीही होती.

मी आत गेलो तेव्हा शहजादी साहिबा गोणपाटावर बसल्या होत्या. ओसरीवर एक चारपाई होती आणि तिच्या समोर अंथरलेल्या गोणपाटावर बसून त्या छोटया खलबत्त्यात पान कुटीत होत्या. गोणपाट बरेच जुने आणि जागोजागी फाटले होते. ठिगळे लावलेली एक पांढरी चादरही अंथरली होती. एक लहानशी, मळलेली उशी ठेवली होती. शहजादी समोर मातीचा लोटा होता. त्यात राख भरलेली होती आणि त्या त्याचा पिकदाणीसारखा उपयोग करीत होत्या. त्यांच्या उजव्या बाजूला पानदान ठेवले होते. त्याची कल्हई उडाली होती. मात्र त्यावर पानाचे डाग नव्हते. खोलीचे दार खारी आणि उंदरांनी खाऊन जीर्ण झाले होते, कडया गंजून गेल्या होत्या.

शहजादी साहेबांचे केस पार पिकले होते. भिवयांचे आणि पापण्यांचे केसदेखील पांढरे झाले होते. तरुणपणात त्या चांगल्या उंचनिंच असल्या पाहिजेत. आता मात्र वाकल्या होत्या. त्यांचे कपडे स्वच्छ होते पण प्रत्येक कपडयावर किती तरी ठिगळे लावली होती. त्यांचा आवाज साफ आणि खणखणीत होता. त्यांचे बोलणे अतिशय गोड आणि छाप पाडणारे होते, भाषा शुद्ध उर्दू होती. त्या अतिशय गंभीरपणे आणि आत्मविश्वासाने बोलत होत्या. त्यांच्या चेहऱ्यावर बऱ्याच सुरकुत्या होत्या आणि शरीर बरेच थकलेले दिसत होते.

मी त्यांना अभिवादन करताच त्या म्हणाल्या "औक्षवंत व्हा. मियॉं, डोळे अधू झाल्यापासून दरग्यात येऊ शकले नाही. तुम्हाला कधी पाहिले नाही, पण बरेच

दिवसांपासून तुमचं नाव मात्र ऐकते आहे. म्हाता-या दासीने ख्वाजासाहेब भेटायला आल्याचं सांगितलं तेव्हा मला खूप बरं वाटलं. ज्यांचं नावच इतके दिवस एकत होते ते स्वतःच माझ्या घरी आले. त्या दरग्याविषयी आमच्या घराण्यातल्या लोकांना खूप श्रद्धा होती. मी नेहमी सतरहवीच्या उरसाला जात असे. आता दृष्टी गेली, हातपायही चालेनासे झाले. बरं, कसं काय येणं केलंत ?"

मी म्हणालो "येण्याचं कारण नंतर सांगीन. आधी मला सांगा, या घरात तुम्हाला काही त्रास नाही ना होत ? हे फारच लहान घर आहे. शिवाय छपरालाही जागोजागी भोकं पडली आहेत. माती पडत असेल." त्या म्हणाल्या, 'अरे मियां, नशिबानं महाल, किल्ला, सगळं हिरावून घेतलं, आता जे काही आहे ते ठीकच आहे. दीड रुपया महिना भाडं देऊन आणखी किती चांगलं घर मिळणार ? छतातून रोज माती पडते. दोन चार वेळा पलंगावरची चादर झटकून साफ करावी लागली नाही असं एकाही रात्री घडत नाही. एका जमान्यात, लाल किल्ल्यातल्या माझ्या महालात मी झोपत असे, तिथे छपरात एका चिमणीनं घरटं बांधलं. त्याच्या गवताच्या काही काडया माझ्या बिछान्यात पडल्या तर मला रात्रभर झोप आली नाही आणि आता रात्रभर माती गळत असते आणि सगळा त्रास तसाच सहन करावा लागतो."

मी विचारले, "सरकारातून काही पेन्शन मिळतं ?" त्या म्हणाल्या, "होय अनेक वर्षांपासून दहा रुपये महिन्याचे मिळतात." मी विचारले "आणखी काही उत्पन्न आहे ?" त्या म्हणाल्या "होय एक घर आहे, त्याचं महिन्याचं सात रुपये भाडं येतं. मी आधी त्याच घरात राहत असे. पण दृष्टी गेल्यापासून पेन्शनच्या दहा रुपयात भागेनासं झालं. म्हणून ते घर भाडयानं दिलं आणि स्वतः या कमी भाडयाच्या घरात राहायला आले. ही एक म्हातारी दासी आणि मी अशा दोघी जणी आहोत. घराचं भाडं, खाण्यापिण्याचा, कपडया-लत्त्याचा, पानसुपारीचा वगैरे सगळा खर्च या सतरा रुपयात चालवावा लागतो." मी म्हणालो, "तुमच्यावर काय काय प्रसंग ओढवले ते मला सांगा. मी तुमच्या घराण्यातल्या इत्तर पुरुषांच्या आणि बायकांच्याही मुलाखती घेतल्या आहेत. मी पुस्तक लिहितो आहे."

हे ऐकताच शहजादीसाहिबा पान कुटणे थांबवून म्हणाल्या, "नाही मियाँ. माझं नाव असं घरो-घरी, गल्लो-गल्ली व्हावं हे मला मान्य नाही." मी म्हणालो, "मी तुमचं नाव छापणार नाही. फक्त काय घडलं ते लिहीन" यावर त्या

म्हणाल्या, "काय घडलं म्हणून सांगू ? फक्त दोनच गोष्टी आहेत आम्ही बादशहा होतो, आता भिकारी झालो. आता काही व्हायचंच असेल तर ते फक्त मरणच उरलं आहे."

मी म्हणालो, "तुम्ही तुमचा इतिहास सांगा. मी नाव पत्ता काहीही लिहिणार नाही." शहजादीसाहेबांना बराच राग आला असावा कारण त्या बराच वेळ गप्प राहिल्या. मग माझ्यासाठी एक पान तयार करून, एक निश्वास टाकून म्हणाल्या, "मियाँ, बंडाच्या वेळी माझं वय दहा अकरा वर्षाचं होतं. आम्ही किल्ल्यात राहात होतो. बादशहा आमच्या कुटुंबावर जरा नाराज होते. पण आमचा तनखा दर महिन्याच्या महिन्याला मिळत असे. मला तीन भाऊ होते आणि मी एकटीच बहीण होते. माझ्या वडिलांनी उतारवयात आणखी एक लग्न केलं होतं. त्यावेळी माझी सख्खी आई पण जिवंत होती. माझी आई आणि तिची सवत यांच्यात सतत भांडणं होत असत. आम्ही चौघं भावंडसुद्धा आमच्या सावत्र आई बरोबर सतत भांडत असू. पण माझ्यावर माझ्या सावत्र आईचं फार प्रेम होतं. आमच्या घरी कितीतरी बायका-पुरुष नोकर होते. बंडापूर्वी सहा महिने माझी सावत्र आई कॉल-याने मरण पावली. बंडाच्या वेळी आम्ही दोघं बहीण-भाऊ, आमची आई आणि वडील इतकीच माणसं जिवंत होती.

बादशहा किल्लयातून हुमायूनच्या मकब-यात निघून गेले. किल्लयात राहणा-या बाकीच्या माणसांनाही हाकलून देण्यात आलं आणि किल्ला रिकामा करण्यात आला. पण आमचं घर किल्लयातल्या इतर घरापासून जरा दूर अंतरावर होतं आणि बरंच भक्कम होतं. त्यामुळे आम्ही घर सोडून जावं ही कल्पना माझ्या वडिलांना मान्य झाली नाही. त्यांचं म्हणणं, 'बाहेर पडलो तर तिघेही मरूच. बाहेर मरण आलेलं फार वाईट. इथेच राहू या जे काही देवाच्या मनात असेल ते या घरातच होऊ दे.'

बादशहा किल्लयातून निघून गेल्यानंतर दोन दिवस आमच्या घरी कुणी आलं नाही. घरातले सगळे दास-दासी पळून गेले होते. आम्ही घराचे सगळे दरवाजे बंद करुन घेतले होते. देवडीला तीनचार दारं होती. त्यांच्या कड्या भक्कम होत्या. तिस-या दिवशी घराबाहेर घोड्याच्या टापांचा आवाज आला आणि कुणी तरी दारं फोडायला सुरुवात केली. माझ्या आईवडिलांनी ताबडतोब वजू (नमाजापूर्वी हात-पाय धुणे) केलं आणि माझ्या सोळा वर्षाच्या भावाला म्हणाले, 'ऊठ वजू कर. मृत्यू आलाय्.' हे ऐकताच माझं काळीज जणू काही

फाटलं. मी आईला बिलगून बसले. तिला रडू आलं आणि तिने मला कुरवाळत म्हटलं 'घाबरु नकोस. देवच आपला रक्षणकर्ता-कदाचित तोच आपल्याला वाचवेल.' त्यानंतर त्या तिघांनी वजू केलं आणि आम्ही ताबडतोब चटई अंथरुन नमाज पढायला सुरुवात केली. बाहेर दरवाजा फोडल्याचा सतत आवाज येत होता. आम्ही अजून नमाज पढतच होतो, इतक्यात दहा-बारा गोरे शिपाई आणि दहा-बारा शीख शिपाई, संगिनी चढवलेल्या बंदुका घेउन आत आले. माझे वडील आणि भाऊ ताबडतोब उठून उभे राहिले. अब्बांनी मला कडेवर घेऊन चादरीने माझं तोंड झाकलं. एका शीख शिपायानं अब्बांना विचारलं, 'तुम्ही कोण आहात? इथे कशाला बसला आहात?' अब्बा म्हालेण ा, 'हे माझं घरं आहे. आम्ही इथेच राहतो. मी बादशहांचा मुलगा आहे. त्या शीख शिपायानं गो-या अधिका-याला सर्व समजावून सांगितले. यावर तो गोरा अधिकारी मोडक्या-तोडक्या उर्दूत काही तरी म्हणाला. त्याचा आम्हाला काहीच अर्थ कळला नाही. मग तो शीख म्हणाला, साहेब म्हणतायत् 'बादशहा पळून गेले, बाकीचे लोकही पळून गेले. मग तुम्ही का नाही पळालात?' अब्बा म्हणाले, 'बादशहा आमच्यावर काहीसे नाराज होते. त्यामुळे ते आम्हाला आपल्या बरोबर घेऊन गेले नाहीत आणि आम्हीही त्यांच्या बरोबर गेलो नाही. आम्ही शिपायांच्या बंडात भाग घेतला नाही. इंग्रज सरकार निरपराध लोकांना त्रास देत नाही असा अम्हाला विश्वास वाटला. आम्ही निरपराध असल्यामुळे पळून गेलो नाही. इंग्रज अधिकारी म्हणाला, तुम्हाला सगळ्यांना पहाडावरच्या आमच्या छावणीत यावं लागेल. तिथे आम्ही शहानिशा करू. तुम्ही निरपराध असलात तर तुमच्या जिवाला काहीही धोका नाही.' अब्बा म्हणाले 'माझ्याबरोबर माझी बायको आणि ही लहान मुलगीपण आहे. इथे काहीच वाहन नाही आणि यांना पायी चालायची सवय नाही.' इंग्रज अधिकारी म्हणाला,' या लढाईच्या दिवसात तुमच्यासाठी वाहनाची सोय आम्हाला करता येणार नाही. तुम्ही इथेच राहिलात तर इतर शिपाई इथे येतील आणि अजाणता तुम्हाला मारुन टाकतील. तेव्हा तुम्ही लौकर निघा. वाटेत कुठे वाहन मिळालं तर या दोघींना त्यात बसवू. पण मिळालं नाही तर या दोघींना पायी चालावं लागेल.'

नाईलाजानं अब्बांनी निघण्याची तयारी केली. त्यांनी काही भारी दागिने आणि रत्नं आपल्याबरोबर घेतली आणि बाकीचं सामान तसंच टाकून आम्ही निघालो. मला भावानं कडेवर घेतलं. माझी आई नेहमी आजारी असायची. तिला अब्बांनी हाताला धरून चालवलं. निघण्यापूर्वी एकदा घराकडे नजर टाकून ते म्हणाले 'आता आम्ही इथे पुन्हा कधीच येणार नाही' आणि तसंच झालं. आम्ही

पुन्हा कधीच त्या घरी गेलो नाही.

आम्ही घराबाहेर आलो. ते इंग्रज आणि शीख शिपाई घोडयावर स्वार झाले आणि दोघा शीख घोडेस्वारांबरोबर आम्हाला पहाडावरच्या छावणीकडे पाठवून स्वत: कुठेतरी निघून गेले. किल्ल्याच्या दरवाजापर्यंत स्वार सावकाश चालत होते. त्यांनी अम्मा आणि अब्बांना काही म्हटले नाही. पण आम्ही किल्ल्याच्या दरवाजाबाहेर पडताच त्या स्वारांनी घाई करायला सुरुवात केली. 'इतक्या सावकाश चाललात तर संध्याकाळ होईल. जरा लौकर पाय उचलायला काय होतं ?' असे ते म्हणू लागले. अब्बांनी नरमाईनं सांगितलं, 'बाबा रे, माझ्याबरोबर ही आजारी आणि अशक्त बाई आहे हे दिसत नाही का ? जन्मभर ती कधी पायी चालली नाही. आम्ही जाणून बुजून हळू-हळू चालतो आहोत का ? बरोबर लहान मूल आणि बाईमाणूस आहे माझा नाइलाज आहे, हे ऐकून स्वार गप्प बसले परंतु माझा भाऊ बोलून गेला 'तुम्ही आमच्याच राज्यातले आहात, तुम्हाला दया नाही येत?' 'यावर एक शीख स्वार म्हणाला, 'आम्ही काय करणार? आम्हाला मालकाचा (ब्रिटिशांचा) हुकूम आहे' भाऊ म्हणाला 'तुमच्या मालकाने आमच्यावर सक्ती करण्याचा तर हुकूम नाही ना दिलेला, शीख स्वार उत्तरला, 'कसली रे सक्ती केली ? पण आता मात्र करावी लागेल. तुम्ही जाणून बुजून उशीर करता आहात.' असं म्हणून एक स्वार आमच्या मागे आला आणि एक समोरुन चालायला लागला. मागे घोडा पाहून अम्मा एकदम घाबरली. तिला छातीत धडधडण्याचा त्रास अनेकदा होत असे. तसंच आता झाले आणि ती बेशुद्ध होऊन पडली. शीख स्वार थोडावेळ हे मुकाटयानं पाहात होता. मग तो अब्बांना म्हणाला, 'मी पायी चालतो तुम्ही या आजारी स्त्रीला घेऊन घोडयावर स्वार व्हा.' शेवटी अब्बांनी अम्माला उचलले आणि व घोडयावर स्वार झाले. तो बिचारा शीख स्वार पहाडातल्या छावणी-पर्यन्त पायी चालला आणि मी माझ्या भावाच्या कडेवर बसून छावणीत पोहोचले. पहाडावर सर्वत्र इंग्रजांचे तंबू होते. आम्हालाही एक तंबू देण्यात आला त्या स्वारांनी सैन्याच्या मटारखान्यातून जेवण आणून दिलं. ती रात्र आम्ही त्या तंबूतच काढली.

दुस-या दिवशी सकाळी फौजेच्या जनरलनं आम्हा सर्वांना हजर करण्याचा हुकूम दिला. आम्ही गेलो. दिल्लीतला कुणी गुप्तहेर जनरलजवळ उभा होता. त्याला जनरलनं विचारलं 'तू या लोकांना ओळखतोस ?' तो म्हणाला' होय, ओळखतो. हे बादशहाच्या कुटुंबातले लोक आहेत. लाल किल्ल्यात इंग्रज स्त्री-पुरुष आणि मुलांची कत्तल झाली तेंव्हा या माणसानं त्या कत्तलीत मदत केली होती' हे ऐकून जनरलनं अब्बांकडे अतिशय रागानं पाहिलं. अब्बांनी उत्तर

दिलं 'हा माणूस खोटं बोलतो आहे. हा आधी माझ्याकडे नोकर होता. त्यानं चोरी केली म्हणून मी त्याला खूप मारहाण केली आणि नोकरीवरुन काढून टाकलं म्हणून शत्रुत्वापोटी हा हे खोटं नाटं सांगतो आहे. बहादुरशहा माझ्यावर किती दिवसांपासून नाराज होते आणि गेली किती वर्षं मी मुजरा करायलाही जात नव्हतो ते त्याला विचारा.' तो माणूस म्हणाला, 'मी यांच्याकडे नोकर होतो हे खरं आहे पण मी चोरी केल्याबद्दल यांनी मला काढून टाकलं हे खोटं आहे. हे पगार फार कमी द्यायचे म्हणून मी स्वत:च यांच्याकडची नोकरी सोडली. बादशहा यांच्यावर नाराज होते हेही बरोबर आहे पण बंड सुरु झाल्यावर बादशहाला खूष करण्यासाठी यांनी बादशहाकडे जाणंयेणं पुन्हा सुरु केलं. ज्या दिवशी इंग्रजांची कत्तल झाली तेव्हा हे स्वत: आणि त्यांचा मुलगा त्यात जातीनं सामील झाले. आणि जे लोक कत्तलीच्या विरुद्ध होते त्यांच्यावर हे दोघं फार रागावत होते. कुणी म्हणालं अशी कत्तल करणं इस्लामच्या तत्त्वाविरूद्ध आहे तर हे म्हणायचे सापाला मारायचं आणि त्याच्या पिल्लांना सोडून द्यायचं हे बरोबर नाही. या दोघांच्याच सांगण्यामुळे इंग्रजांच्या बायकामुलांची कत्तल झाली.' हे ऐकून तो जनरल रागाने लालबुंद झाला. त्यानं मग अब्बांचं काही एक ऐकलं नाही. त्यानं हुकूम दिला, 'आत्ताच्या आत्ता या दोघांना गोळया घाला.' मग तो म्हणाला, 'या दोघांनी आमच्या बायका-मुलांना ठार मारलं. पण आम्ही याच्या बायकोवर आणि मुलीवर दया करुन त्यांना सोडून देतो आहोत. या दोघींना छावणीतून हाकलून द्या त्यांना जायचं तिकडे जाऊ देत.'

गोरे आणि देशी शिपाई पुढे झाले. त्यांनी अब्बांचे आणि भावाचे हात पाठीमागे बांधले. माझ्याकडे पाहून अब्बांना रडू अनावर झालं पण भाऊ शांतपणे उभा होता. अम्मा किंचाळून बेशुद्ध पडली. अब्बांजवळ जाण्यासाठी मी धावले पण एका शिपायानं धक्का मारल्यामुळे मी अम्माच्या अंगावर कोसळले. शिपाई अब्बांना आणि भावाला लांब घेऊन गेले. त्यांच्यासमोर चार पाच शिपाई बंदूक घेऊन उभे राहिले. त्यांच्याजवळ जनरलही उभा होता तो खडया आवाजात काहीतरी म्हणाला पण मला ते कळलं नाही. मग त्यानं शिपायांना इशारा दिला शिपायांनी बंदुकीच्या नळया अब्बा आणि भावाच्या दिशेनं रोखल्या. अब्बा माझं नाव घेऊन म्हणाले 'बाळ, मी या जगातून चाललो. देव तुझं रक्षण करो.' भाऊ म्हणाला 'अम्मा, तुझा हा त्रास माझ्यानं पाहावत नाही. मी चाललो सलाम.'

बंदुका झाडल्याचा आवाज आला. खूप धूर दिसत होता. भाऊ आणि अब्बा जमिनीवर पडले होते. मी रडत होते आणि भीतीने कापतही होते. अम्मा जराशी

शुद्धीवर आल्यावर मी तिला सांगितलं 'भाई आणि अब्बांना मारुन टाकलं. ते बघ धुळीत पडले आहेत, त्यांच्या छातीतून रक्त येतं आहे. भाई अब्बा आता कायमचे गेले. आता ते पुन्हा कधी परत यायचे नाहीत. अब्बांनी मला हाक मारली होती आणि भाईनं तुला हाक मारली होती. आई ग, आता काय होणार ? आपल्याला पण मारून टाकतील का ? हे लोक आपल्याला कैद करतील का ?' अम्मा हाताचा टेकू देऊन उठली आणि तिनं भाई आणि अब्बांच्या प्रेतांकडे नीट पाहिलं. ती निर्जीव पडली होती. अम्मा व्याकुळ होऊन म्हणाली, 'माझा मुलगा, माझा सोळा वर्षाचा पोटचा गोळा. माझ्या जीवनाचा आधार माझ्यापासून तुटला. संपलं सगळं. आता माझं या जगात काही उरलं नाही. अल्ला, हे स्वप्न आहे की माझ्यावर खरोखरच संकट आलं आहे ? माझा स्वामी देखील गेला. अरे गुप्तहेरा, अल्ला तुझं तळपट करो. किती खोटं बोललास रे. अरे बंड सुरू झाल्यापासून एकही दिवस हे दोघं घराबाहेर सुद्धा पडले नाहीत. कुठल्या कर्माचा तू सूड घेतलास रे ? माझ्या सारख्या आजारी बाईची तुला दया आली नाही, या अजाण लेकराचाही तू विचार केला नाहीस आणि आमच्या आधारांना विनाकारण ठार मारलंस.'

अम्मा आक्रोश करीत होती इतक्यात देशी शिपाई आले. त्यांनी अम्माला आणि मला दंडाला धरुन उठवलं आणि खेचत घेऊन निघाले. आम्ही प्रेतांजवळून गेलो तेव्हा पाहिलं, त्या दोघांच्या चेह-यावर आणि छातीवर गोळ्या लागल्या होत्या. त्यांची रक्तानं माखलेली शरीरं निश्चेष्ट पडली होती. शिपाई आम्हाला ओढत घेऊन चालले होते. आम्हाला दोघींनाही चालता येत नव्हते. पण ते आम्हाला शेळ्या-मेंढयांसारखे फरफटत होते. पहाडावरच्या दगड धोंडयांना ठेचाळून आमचे पाय रक्तबंबाळ झाले होते. आम्हाला त्या वेळी जसा त्रास सहन करावा लागला तसा कुणाला सहन करावा लागू नये.

शिपायांनी आम्हाला छावणीबाहेर सोडून दिलं. अम्मा बेशुद्ध होऊन पडली. मी तिच्याजवळ बसून रडायला लागले. थोडया वेळानं एक गवत विकणारा आला तो गवताचा भारा घेऊन चालला होता, त्याने भारा बाजूला ठेवून अम्माला पाहिलं मग तो म्हणाला, 'अरे, ही बाई तर मेली.' तो हिंदू होता.मला तिथेच ठेवून तो छावणीत गेला आणि दोन तीन मुसलमान गवत कापणा-यांना घेऊन आला. त्यांनी माझ्या आणि अम्माच्या अंगावरचे सगळे दागिने काढून घेतले. ते आपसात म्हणत होते, 'यांच्या पुरुषांना मारलं तर तेंव्हा त्यांच्याजवळ बरंच जडजवाहिर मिळालं. ते सगळं सरकारी खाजिन्यात जमा झालं पण आता हे आपल्या मालकीचं आहे. मग त्यांनी खड्डा खणून अम्माला पुरलं आणि दोघंजण मला घेऊन अजमेरी दर-

वाजा जवळ आले आणि मला सोडून निघून गेले. मी एकटीच रडत बसले होते. थोडया वेळानं खानिमच्या बाजारातून काही मुसलमान सोनार आपल्या बायका-मुलांसहित आले. ते कुतुबमिनारला चालले होते. ते मला आपल्याबरोबर कुतुबमिनारला घेऊन गेले. शहरातलं वातावरण निवळलं तेव्हा ते सोनारही परत आले. मग त्यांनी मला माझ्या काही नातेवाईकांजवळ सोपवलं. त्या नातेवाइकांजवळच मी लहानाची मोठी झाले, त्यांनीच माझं लग्न करुन दिलं. लग्नानंतरच माझं पेन्शन सुरु झालं. खुदाच्या दयेनं मला पुष्कळ मुलं झाली. पण त्यातलं एकही वाचलं नाही. नवरासुद्धा मेला. गेल्या चार वर्षापासून डोळे ही गेले.

ऐकलीस मियाँ माझी अभागिनीची कर्मकहाणी ? माझ्या रोमारोमातून दुःखाचे हुंदके फुटत असतात. मी या जगात फक्त दहाव्या वर्षापर्यंत सुख भोगलं. आणि नंतर सत्तर वर्षं दुःखाशिवाय काही पाहिलंच नाही. आता मरणाच्या दाराशी येऊन पोहोचले आहे. आज आहे, उद्याचं कुणी सांगावं ? ही बडी बी बिचारी आहे मदतीला. बाजारातून सामान-बिमान आणून देते आणि सतत माझ्या आसपास असते. आम्ही दोघी आयुष्याचे हे शेवटचे दिवस जमतील तसे घालवतो आहोत.'

# नरगिस नजर

शहजादी नरगिस नजर, बहादुरशहांचा मुलगा मिर्झा शाह रुख यांची मुलगी होती. 1957 च्या बंडाच्या वेळी तिचे वय सतरा वर्षाचे होते.

दिल्लीच्या लाल किल्ल्यात दीवान-ए-खास आणि मोती मस्जिदच्या पश्चिमेला एक तलाव आहे. त्या तलावात अतिशय सुंदर महाल आहे. उत्तरेकडच्या एका झ-यातून या तलावात पाणी येते. तलावात जागोजागी संगमरवराचे झरोके आणि दिवे ठेवण्याचे जाळीदार कोनाडे बनवले आहेत. त्यावरुन पाणी वाहते. मिर्झा शाह रुख बहादुर याच महालात राहात असत. त्यांची पत्नी मरण पावली होती. त्यामुळे मिर्झा साहेबांचे आपली मुलगी नरगिस नजर हिच्यावर खूपच प्रेम होते.

तलावातला तो महाल काश्मिरी शाली, तुर्कस्तानातले गालिचे आणि बनारसी कापडांनी सजवला होता. नरगिस नजरला महाल सजवण्याचा छंद होता आणि तिची या बाबतीतली आवड-निवडही फार चांगल्या दर्जाची होती. तिचा महाल, लाल किल्ल्यातल्या सर्व हवेल्या आणि महालांमधे सर्वात सुंदर आणि सजवलेला मानला जात असे.

सकाळी सूर्योदय झाल्यानंतर नरगिस नजर उठत असे. उन्हाळयाच्या दिवसात तिचा छपरी पलंग बाहेर अंगणात ठेवण्यात येत असे. अंगणाची फरशी संगमरवरी होती. छपरी पलंगाचे पाय सोन्याचे होते आणि त्यावर रत्ने जडवलेली होती गादी सुंदर रेशमी होती आणि उशाही रेशमी होत्या. डोक्याशी चार मऊ उशा असत आणि या उशांजवळच दोन लहान लहान गोल उशा असत त्यांना गाल-उशा म्हणत. शहजादीचे डोके उशीवरुन घसरले तर गालांना आधार देण्यासाठी ह्या गाल उशा होत्या. पलंगावर दोन मोठे मोठे लोडही दोन बाजूंना असत. शहजादी त्यांवर गुडघे विसावत असे. उशांवर आणि गाल-उशांवर रात्री चाफ्याची आणि जाई-जुईची फुले ठेवली जात. शहजादी पलंगावर जाताच चार गाणा-या मुली मंद स्वरात गात असत आणि त्या सुरांवर ती झोपी जात असे. सकाळीही सूर्योदया-पूर्वी या मुली पलंगाजवळ येऊन गात असत आणि त्यांच्या गाण्याने शहजादी जागी होत असे.

त्यानंतर ती पलंगावर उठून बसे आणि बराच वेळ जांभया देत आळोखेपिळोखे देत बसे. गाणा-या मुली तिच्याशी गंमतीदार बोलत असत.

एक म्हणायची, "सरकार रुमाल देऊ? जांभई येते आहे तोंड तर झाका."

दुसरी म्हणायची, "बाई साहेब तुमचे आळोखेपिळोखे पाहायला मासोळया-सुद्धा पाण्याच्या वर येत आहेत.' नरगिस नजर डोळे चोळत, हसत-हसत म्हणायची, "चल ग, किती खोटारडी आहेस." यावर ती मुलगी म्हणायची, "मी खरं बोलते की खोटं ते या आरशालाच विचारा ना. हे विस्कटलेले केस, मेंदी लावलेली लाल लाल बोटं उंचावत आळस देणं-तो आरसासुद्धा सगळयाची तारीफ करतो आहे."

तिसरी म्हणायची, "लाल ढगांमधून सूर्याची किरण बाहेर येताहेत, जसे काही बाईसाहेबांचे लाल लाल ओठ आणि चमकदार दात. आणि बाईसाहेबांच्या गालांवर तर पहाटेची लाली आहे. केस विस्कटून चेहऱ्यावर आले आहेत तर असं वाटतं आहे, जणू काही चतुर्दशीच्या चंद्रावर ढग आले आहेत."

नरगिस नजर हे सर्व ऐकून स्मित करत पलंगावरुन उतरत असे. मग चौरंगावर बसून, डाळीचे पीठ लावून चेहरा आणि हात-पाय धुवत असे आणि कपडे बदलून नाश्ता करीत असे. नंतर घराच्या सजावटीकडे ती स्वतः लक्ष देत असे आणि नित्य नवीन रचना करत असे. दुपारी जेवणानंतर गाणे-बजावणे होत असे. संध्याकाळी ती बागेत फुलांच्या ताटव्यांमधून विहार करत असे. रात्री खास मैत्रिणींसमवेत, सगीताच्या सुरांवर जेवण होत असे.

त्या रात्री बहादुरशहा लाल किल्ल्यातून हुमायूनच्या मकब-यात गेले होते आणि इंग्रजांचा विजय होणार हे निश्चित दिसत होते. नरगिस नजर तलावातल्या आपल्या महालातून एकटीच चांदण्यांकडे बघत होती. तिचे प्रतिबिंब तलावात पडले होते आणि त्या प्रतिबिंबाकडे पाहून ती स्वतःच धंद होत होती.

इतक्यात तिचे वडील मिर्झा शाहरुख आत आले आणि तिला म्हणाले, "बेटी नरगिस, मी अब्बांबरोबर चाललो आहे. तू आत्ता येतेस की तुझ्यासाठी वाहनाची व्यवस्था करु ? मग तू वाटल्यास सकाळी ये." नरगिस नजर म्हणाली "अब्बा, तुम्ही सुद्धा आत्ता जाऊ नका. उद्या रात्री माझ्या-बरोबर चला. आजोबांबरोबर जाणं योग्य नाही. इंग्रजांचं सैन्य त्यांना नक्की हुडकून काढील आणि त्यांच्याबरोबर जे जे सापडतील त्या सगळयांना दोषी ठरवलं जाईल. म्हणून आजोबांबरोबर हुमायूनच्या मकब-यात जाणं योग्य नाही. आपण गाजियाबादला जाऊ या. तिथे माझ्या दाईचं घर आहे. ती फार चांगली आणि सुरक्षित जागा आहे. वेष बदलून जायला पाहिजे. हे संकट टळलं की पुन्हा परत येऊ."

मिर्झा म्हणाले, "जशी तुझी मर्जी. गाजियाबादला जाण्यासाठी वाहनाची व्यवस्था करतो. तुझ्याबरोबर कोण कोण जाणार आहे ?"

नरगिस नजर म्हणाली, "कुणी नाही. मी एकटीच जाईन. नोकरांना बरोबर घेणंही ठीक नाही. शिवाय नोकरांचीही बरोबर यायची इच्छा दिसत नाही." हे ऐकून मिर्झा निघून गेले आणि नरगिस नजर तळयातल्या चंद्राच्या प्रतिबिंबाकडे पाहू लागली.

थोडया वेळाने तिने दासींना हाका मारल्या पण कुणीच आले नाही. सर्व पळून गेले आहेत आणि संपूर्ण महालात आपण एकटयाच आहोत हे तिच्या लक्षात आले. ती घाबरुन आत गेली. आत दिवे जळत होते, पण कुणीच नव्हते. आत तिला जास्तच भीती वाटली आणि ती बाहेर आली. किल्ल्यात सगळीकडून बोलण्याचा आवाज येत होता आणि लोक घरे सोडून जात असल्याचे दिसत होते. नरगिस नजरने बराच वेळ आपल्या वडिलांची वाट पाहिली. पण ते आले नाहीत. नरगिस नजरला रडू येऊ लागले. रात्री दोन वाजता अंत:पुरातला एक नोकर तिच्या महालात आला. तो म्हणाला, "आपल्या वडिलांनी सांगितलं आहे की इंग्रजांचे जासूद किल्ल्यात आणि बाहेरही त्यांचा शोध घेत फिरत आहेत, तेव्हा ते आपल्याबरोबर गाजियाबादला येऊ शकणार नाहीत. ते वेष बदलून कुठे तरी जात आहेत. आपण माझ्याबरोबर चला, वाहन तयार आहे."

नरगिस नजरला भीती वाटली. ती म्हणाली, "पण जायचं कुठे ?" नोकर म्हणाला, "ते मला माहीत नाही." नरगिस नजर अधिकार वाणीने म्हणाली, "जा, अब्बा कुठे जाताहेत ते विचारुन ये. ते माझ्याबरोबर गाजियाबादला का येत नाहीत तेही विचार."

नोकर गेला आणि थोडयाच वेळात परत येऊन म्हणाला, "आपले वडील, साईसाचे कपडे घालून किल्ल्यातून निघून गेले. ते कुठे गेले हे कुणालाच माहीत नाही. आपल्यासाठी रथ तयार आहे." नरगिस नजरला रडू आले. आयुष्यात प्रथमच ती हुंदके देऊन रडू लागली. तिने दागिन्यांची पेटी आणि काही कपडे घेतले आणि निघाली. निघण्यापूर्वी तिने आपल्या महालाकडे, त्याच्या सजावटी कडे डोळे भरुन पाहिले. हा महाल आपल्याला कायमचा पारखा झाला की पुन्हा या महालात येता येणे नशिबात आहे, असा विचार करीतच ती रथात बसली.

रात्रीचे तीन वाजले होते. सकाळी आठ वाजता ती गाजियाबादला पोहोचली. ती जात असताना वाटेत अनेक लोक भेटले. पण कुणी तिचा रथ थांबवला नाही. गाजियाबादमध्ये नरगिस नजरच्या दाईचे घर प्रसिद्ध होते.

नरगिस नजर तिच्या घरासमोर रथातून उतरताच ती धावतच आली. तिने नरगिस नजरला अतिशय प्रेमाने आत नेले आणि तिचे खूप आदरातिथ्य केले.

त्या घरात नरगिस नजर दोन तीन दिवस आरामात राहिली. अचानक, बादशहांना पकडण्यात आलं असून त्यांच्या मुलांना ठार करण्यात आलं आहे आणि फौज आता गाजियाबादमधे लूटालूट करायला येत आहे अशी बातमी आली. नरगिस नजरने दागिन्यांची पेटी, दाईकरवी जमिनीत पुरली आणि ती येऊ घातलेल्या संकटाची प्रतीक्षा करू लागली.

थोडयाच वेळात इंग्रजांच्या शीख फौजेनं गाजियाबाद मध्ये प्रवेश केला आणि त्यांनी बंडखोरांना हुडकून काढायला सुरवात केली. काही चहाडखोरांनी, बादशहांची नात तिच्या दाईच्या घरी असल्याची बातमी त्यांना दिली. त्या बरोबर काही शीख शिपाई दाईच्या घरी आले आणि त्यांनी दाईला आणि तिच्या कुटुंबियांना पकडले. नरगिस नजर लपून बसली होती. पण तिलाही त्यांनी दारे फोडून बाहेर काढले आणि बुरख्याशिवाय समोर उभे केले. त्यांच्या सरदाराने विचारले, "तू बहादुर शहाची नात आहेस ?" नरगिस नजर म्हणाली "मी एका माणसाची मुलगी आहे. बादशहाची नात असते तर या गरिबाच्या घरी कशी दिसले असते ? देवाच्या दयेनं बादशहाची नात असतेच तर तुम्ही कुणी मला असं बुरख्याशिवाय समोर उभं केलं नसतं. तुम्ही भारतीय आहात. आपल्याच देशातल्या बायकांशी असं वागायला तुम्हाला लाज नाही वाटत ?" सरदार म्हणाला, "आम्ही काय वावगं वागलो ? तू कोण आहेस याची फक्त माहिती आम्हाला हवी आहे. तू बहादुरशहाची नात आहेस आणि बहादुरशहानी आणि तुझ्या बापानं, लाल किल्ल्यात इंग्रजांची आणि त्यांच्या बायकामुलांची कत्तल केली असं आम्ही ऐकलं आहे." नरगिस नजर म्हणाली, "जो करतो तो भोगतो. माझ्या वडिलांनी कत्तल केली की नाही त्यांनाच विचारा. मी काहीही अपराध केला नाही आणि मी कुणाला मारलेलंही नाही."

हे ऐकून एक तरुण शीख शिपाई म्हणाला, "बरोबर आहे. तू तर नजरेचेच बाण मारतेस तुला तलवारी हत्यारांची काय गरज ?"

नरगिस नजरच्या आयुष्यात परपुरुषाशी बोलण्याचा हा पहिलाच प्रसंग होता तरीही ती हिम्मतीने म्हणाली, "खामोश ! शाही घराण्यातल्या स्त्रीशी असभ्यपणे बोलतोस, जीभ उखडली जाईल." हे ऐकून तो तरुण शीख संतापला आणि त्याने तिचे केस पकडून हिसडले. पण त्याच्या वृद्ध सरदाराने त्याला आवरले आणि "स्त्रीशी असे वागणे बरे नव्हे" असे त्याला सांगितले. तरुण

शिखाने तिचे केस सोडून दिले. मग एक भाडयाची बैलगाडी मागवण्यात आली आणि नरगिस नजरला त्यात बसवण्यात आले. शिपायांनी तिला विचारले, "तुझे दागिने कुठे आहेत ?" नरगिस नजर म्हणाली, 'मी स्वतःच अनमोल आहे. माझा सांभाळ करणा-यांची मी दौलत आहे. माझ्याजवळ आणखी काही नाही." यावर शिपाई काही बोलले नाहीत. बैलगाडी निघाली. नरगिस नजरच्या दाईला आणि तिच्या कुटुंबियांनाही कैद करण्यात आले होते, तेही बैलगाडीबरोबर पायी निघाले.

हिंडन नदीजवळ जाट आणि गुजरांनी अचानक शीख शिपायांवर बंदुकांमधून गोळयांचा वर्षाव करायला सुरुवात केली. शिखांनीही प्रत्युत्तर दिले. पण शीख त्या मानाने थोडे होते त्यामुळे त्यांचा निभाव लागला नाही आणि ते सर्व मारले गेले. मग ते जाट आणि गुजर कैद्यांना आपल्या गावात घेऊन गेले.

गावात गेल्यावर तिथल्या अडाणी लोकांनी नरगिस नजरच्या अंगावर जे काही दोनचार दागिने होते ते काढून घेतले. इतकेच नव्हे तर तिच्या अंगावरचे भारी कपडेही त्यांनी काढून घेतले आणि कुणा चांभारणीचा फाटका कुडता आणि सलवार आणि मळकट दुपट्टा तिला देण्यात आला. नरगिस नजर खूप रडली आणि अखेर नाइलाजाने तिने ते कपडे घातले थोडया वेळाने शेजारच्या गावातले काही गावंढळ मुसलमान आले आणि त्यांच्या पटवा-याने गुजरांकडून नरगिस नजरला विकत घेतले व तो तिला आपल्या गावात घेऊन आला. त्या गावात सर्व 'तगा' जमातीचे मुसलमान होते. तो पटवारी म्हातारा होता. त्याचा मुलगा अडाणी असला तरी दिसायला चांगला होता. त्याने नजरगिस नरजचे त्याच्याशी लग्न ठरवले. नरगिस नजरने ही होकार दिला. मग गावातल्या काझीने त्यांचे लग्न लावले. नरगिस नजरने पटवा-याच्या घरी तीन-चार महिने नवी नवरी म्हणून सुखात घालवले.

इकडे दिल्लीवर इंग्रजांनी पूर्ण ताबा मिळवला होता. त्यांचे गुप्तहेर सर्वत्र हिंडत होते. मिर्झा सापडले नसले तरी त्यांची मुलगी अमूक गावात अमूक नावाच्या पटवा-याच्या घरात आहे हे कुणी तरी दिल्लीतल्या इंग्रज अधिका--यांना सांगितले. अधिका-यांनी त्या गावात पोलीस पाठवले. पोलिसांनी गावाला वेढा घातला आणि त्यांनी नरगिस नजरच्या नव-याला आणि सास-याला अटक केली व दिल्लीला नेले. इंग्रज अधिका-यांनी नरगिस नजरला मिर्झा शाहरुख यांच्याबद्दल बरेच प्रश्न विचारले. पण विशेष काहीच माहिती त्यांना मिळाली नाही. तेव्हा त्यांनी पटवारी आणि त्याच्या मुलाला विद्रोही ठरवून त्यांची तुरुंगात

रवानगी केली. त्या दोघांना दहा-दहा वर्षे कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. नरगिस नजरला दिल्लीतल्या कुणा मुसलमानाच्या हवाली करण्याचे ठरवण्यात आले. तिला कुणाकडे जायची इच्छा आहे हे विचारण्यात आले. ती म्हणाली "माझ्या खानदानातले कुणी दिल्लीत असतील तर मला त्यांच्याकडे पाठवा." परंतु मोगल सम्राटाच्या घराण्यातले लोक एक तर भूमिगत तरी झाले होते किंवा लांब खेडयांमध्ये वा जंगलात राहात होते. दिल्लीत अद्याप कुणीच परत आले नव्हते. त्या मुळे नरगिस नजरला एका मुसलमान शिपायाच्या हवाली करण्यात आले. तो तिला आपल्या घरी घेऊन आला. त्याच्या बायकोने एक तरुण आणि रुपवान् बाई आपल्या घरी आलेली पाहताच नव-यावर आग पाखडायला सुरुवात केली आणि नरगिस नजरला घरातून हाकलून दिले.

मग तो शिपाई तिला आपल्या एका मित्राकडे घेऊन गेला. तो वयस्क मुसलमान होता आणि आपल्या घरात एकटाच राहात होता. त्यांना नरगिस नजरची कर्मकहाणी ऐकून फार वाईट वाटले आणि त्यांनी तिला उदारपणे आपल्या घरात निवारा दिला. एक दिवस ठीक गेला.

दुस-या दिवशी रात्री ती झोपली-असताना काही माणसे आली. त्यांनी तिच्या तोंडात बोळा कोंबला आणि तिला उचलले. तिने बराच प्रतिकार केला पण तिचे बळ अपुरे पडले. ती माणसे तिच्या सास-याच्याच गावची होती. त्यांनी तिला दिल्ली जवळच्या एका खेडयात आणले. तिला एक झोपडी राहायला देण्यात आली आणि एक बाज झोपायला देण्यात आली. या गावातही 'तगा' जमातीचे मुसलमान होते.

नरगिस नजर त्या गावच्या पटवा-याकडे मोलकरीण म्हणून तीन चार वर्षे राहिली. तिला घरातले सर्व काम करावे लागत असे. मात्र शेणाच्या गोव-या थापणे आणि दुधाची धार काढणे तिला कधीच जमले नाही.

चार वर्षानंतर तिच्या नव-याला इंग्रज सरकारने सोडून दिले. नंतर तो तिला आपल्या गावी घेऊन गेला. तिने सर्व आयुष्य तिथेच व्यतीत केले. त्यांना बरीच मुले झाली. १८७७ साली ती मरण पावली.

नरगिस नजर आपल्या आठवणी सांगताना एक आठवण जरूर सांगायची. ती म्हणायची, "मी दिल्लीजवळच्या गावात तगा जमातीच्या पटवा-याकडे मोलकरीण होते तेव्हाची गोष्ट. पावसाळयाचे दिवस होते. ढग गडगडत होते. विजा चमकत होत्या. मी माझ्या झोपडीतल्या मोडक्या बाजेवर एक जाडीभरडी चादर पांघरून झोपले होते. मला स्वप्न पडले की मी पूर्वीसारखीच माझ्या महा-

लात सोन्याच्या छपरी पलंगावर झोपले आहे. माझ्या रेशमी उशांजवळ जाई-जुई चाफ्याची फुलं होती. गाणाऱ्या मुली हळुवार आवाजात काही गात होत्या आणि मी फार मजेत पहुडले आहे. स्वप्नातच मी गाणाऱ्या मुलीला हाक मारुन मच्छरदाणी दूर करुन मला उठवायला सांगितलं. ती धावतच आली आणि तिनं मला उठवून बसवलं. तिनं मला हलकासा चिमटाही काढला. मी तिला चापट मारताच ती हसायला लागली. इतक्यात माझे डोळे उघडले. सगळीकडे दाट अंधार होता. मी या स्वप्नानं आणि माझ्या महालाच्या आठवणीनं बेचैन झाले. मी झोपडीच्या दरवाजात जाडीभरडी चादर पांघरुन उभी राहिले. पाऊस कोसळत होता. वीज चमकली की अंगणात साठलेलं पाणी दिसायचं आणि मला वाटायचं मी माझ्या तळयातल्या महालाच्या अंगणात उभी आहे.

नशीब फिरले तेव्हापासून मी कधी धीर सोडला नव्हता की जुन्या वैभवाच्या आठवणी काढल्या नव्हत्या. पण त्या रात्री का कोण जाणे, मला माझ्या महालाची फार आठवण येत होती. मी हिंदुस्थानच्या सम्राटाची नात आहे, माझ्या वडिलांची एकुलती एक लाडकी मुलगी आहे हेही आठवलं. मी सतरा वर्षाची होईपर्यंत राजकुमारी होते आणि आता एक अनाथ, दरिद्री मोलकरीण आहे हेही जाणवलं. सगळया किल्ल्यात सर्वात उत्तम कपडे माझ्याकडे होते. माझ्या महालात दुर्मिळ वस्तूंचा संग्रह होता. महालातल्या सगळया वस्तू स्वच्छ, टापटिपीनं ठेवलेल्या असायच्या. तोच माझा छंद होता. पण नशिबानं सगळं हिरावून घेतलं. दाईच्या घरी जे दागिने पुरुन ठेवले होते ते नंतर काढण्यासाठी उकरलं तर तिथे काहीच नव्हतं. कोण घेऊन गेलं कुणास ठाऊक. आधीचं काहीच उरलं नाही. फक्त मीच उरले. तीही सर्वार्थानं बदलेली, कुठलीच आशा-आकांक्षा न उरलेली.

मला ही सगळी जाणीव इतक्या तीव्रतेनं झाली की मला मूर्च्छा आली आणि मी खाली पडले. सकाळ होईपर्यंत मी अशीच बेशुद्ध पडले होते. सकाळ झाली. मी तीच नगू मोलकरीण होते. तेच स्वयंपाक घर होतं, घरातल्या कामाचा तोच रोजचा रगाडा होता. मी मनाशी म्हणाले, "जे होऊन गेलं ते स्वप्न होतं. ते जे समोर आहे तेच सत्य आहे." आणि मी कामाला लागले."

---

**साईस**—मोतद्दार. घोडयाला खरारा करणारा,

# मह्जमाल

"दिलशाद, गुदगुल्या करु नकोस. मला झोपू दे. नमाजाला उशीर होतोय् तर काय करू ? डोळेच उघडावेसे वाटत नाहीत."

"बाईसाहेब, गुदगुल्या मी नाही केल्या. हे गुलाबाचं फूल तुमच्या तळव्यांनी डोळे चोळतंय्."

"कुस्करून टाकीन मी ते फूल. इतक्या लौकर कशाला उठवतेस ग ? मला अजून झोपायचंय. जरा सुंदरीला बोलाव तर. तिला बासरीवर हलक्या स्वरात भैरवी वाजवायला सांग. गुलचमन, तू मालिश कर, तू एखादी गोष्ट सांग."

"गोष्टी सांगत बसले तर झालंच. गोष्टी काही दिवसा सांगायच्या नसतात. ही सुंदरी आली. गुलचमनला बोलावते. अम्मा जान आल्या तर मह् जमालला अजून उठवलं नाही म्हणून रागावतील ना ! नमाजाची वेळ टळते आहे."

सुंदरी बासरी वाजवत होती. मह् जमालने डोळे उघडले, केस सावरत मंद स्मित केले आणि कलिमा, म्हटला. नरगिसने सलाम केला, मह् जमालने तिला चिमटा घेतला. मग आळस देत ती उठून बसली आणि म्हणाली.

"दिलशाद, मी नरगिसला चिमटा घेतला तर ही हसली नाही. तोंड वाकडं केलं. तूच ये. तुझा कान पिळते आणि तू खूप हास."

दिलशाद लांब पळाली आणि म्हणाली. "घ्या, मी हवी तेवढी हसते. माझा कान पिळला असं समजा."

मह् जमालने आळस दिला आणि ती हसत हसत न्हाणी घरात गेली. तिने हातपाय धुतले आणि नमाज पढला मग अंगणात आली आणि बागेजवळच्या चौरंगावर जाऊन बसली. तिने कुराण वाचायला सुरुवात केली. सगळ्या दासी घराची रोजची साफ सफाई करायला लागल्या. कुणी नाश्त्याची तयारी करायला लागल्या.

मह् जमालचे कुराण वाचणे झाले तेवढयात बागेची माळीण एका लहानशा टोपलीत हिरव्या मिरच्या घेऊन आली. तिने मह् जमालची दृष्ट काढली, तिला आशीर्वाद दिला, मग म्हणाली, "सरकार, तुम्ही लावलेल्या मिरचीच्या झाडांना मिरच्या आल्या. पहिल्या मिरच्या तुमच्या भेटीसाठी आणल्या."

मह् जमालने टोपली हातात घेतली. सगळया दासींना बोलावले आणि मिरच्यांच्या बातमीने सगळया महालात एकच जल्लोष उडाला. नरगिस म्हणाली, "आहा, कशा हिरव्यागार तजेलदार आहेत." दिलशाद म्हणाली "अगदी जसे काही बाईसाहेबाचे गालच." सुंदरी म्हणाली "टोपलीत कशा पडल्या आहेत पहा, आमच्या बाईसाहेब छपरी पलंगावर झोपतात तशा." गुलचमन म्हणली "झाडा वरुन उतरल्या, आपल्या घराला सोडून आल्या, म्हणून अशा पडल्या आहेत."

मह् जमाल म्हणाली, "या माळणीला कपडे द्या, जोडे द्या, रोख पाच रुपये ही द्या, माझ्या झाडांचा पहिला बहार घेऊन आली आहे म्हणून हिचं तोंड गोड करा."

माळणीला रेशमी कपडे, जोडे मिळाले. चांदीची कडी मिळाली. लाडू मिळाले आणि पाच रुपयांबरोबर पानाचा विडाही मिळाला. ती दुवा देत आपल्या घरी गेली. इकडे महजमालच्या अम्माजानला मिरच्यांची खुश खबर दासींनी जाऊन सांगितली. अम्मा जान महजमालच्या महालात आल्या. त्यांच्या बरोबर मुगलानी (वरच्या दर्जाची दासी) होती. महजमालने प्रणाम केला, अम्मा जानने आशीर्वाद दिला. अम्मा जान आणि मुगलानीने मिरच्यांची खूप तारीफ केली. नंतर कितीतरी वेळ त्या महालात मिरच्यांचीच चर्चा होत होती.

महजमाल ही खुर्शीद जमालची एकुलती एक मुलगी होती. तिचे वडील मिर्झा अली गौहर ऊर्फ नीली, शाहआलमचा मुलगा दुसरा अकबर यांचे बंधू. ते मरण पावले होते. त्यांना इतर रखेल्यांपासून बरीच मुले होती. पण बेगमपासून उतारवयात झालेले केवळ एकच अपत्य होते. तीच महजमाल. मिर्झा नीली निधन पावले तेव्हा महजमाल केवळ पाच वर्षाची होती. आता ती पंधरा वर्षाची आहे. सावळा रंग, उभट चेहरा, मध्यम उंची, काळेभोर मादक डोळे आणि अतिशय दर्दभरा आवाज. ती बोलते तेव्हा काळजात रुतल्यासारखे वाटावे इतके कारुण्य तिच्या आवाजात आहे. ती अतिशय अल्लड, खोडकर परंतु मृदु हृदयाची आहे. शहजादी आहे. बापामागे जास्तच लाडात वाढली आहे. त्यामुळे ती काहीशी हट्टी बनली आहे. तिचे शरीर अतिशय बारीक आहे. चालताना जरासे पोक देखील काढते. ती इतकी अशक्त आहे की चालताना बरेचदा तिचा झोक जातो. त्यामुळे दासी सारख्या मागे-पुढे धावत असतात.

'फूल वालों की सैर' (दिल्लीतला प्रसिद्ध उत्सव) होती. त्या दिवसात बहादुरशहा, कुतुब साहिबच्या दरग्याजवळ नव्या जफर महालात राहात होते. बेगमाही त्यांच्या बरोबर होत्या. पण खुर्शीद जमाल आणि मह् जमाल यांनी

दुसरा महाल स्वतः साठी घेतला होता. कारण मिर्झा नीलींच्या वेळेपासूनच त्यांचे बहादुरशहांबरोबर पटत नसे. बहादुरशहांना इंग्रज सरकार दर महिना एक लाख रुपये देत असे. त्यातले दर महिना एक हजार रुपये खुर्शीद जमालला मिळत असत. स्वस्ताईचे दिवस होते. तेव्हाचे एक हजार रुपये आज कालच्या एक लाख रुपयां इतकेच होते. खुर्शीद जमाल अगदी वैभवात आणि आरामात राहात होती. 'फूल वालों की सैर'च्या पहिल्या दिवशी तिस-या प्रहरी मह जमाल महालाच्या देवडीवर चिकाच्या पड्याआड बसली होती, सनया-चौघडे वाजत होते. रंगी बेरंगी कपडे घातलेले दिल्लीतले हिंदू-मुसलमान पंख्याच्या मिरवणुकीत होते.

संध्याकाळच्या नमाजाची वेळ झाली तेव्हा खुर्शीद जमाल ने 'आधी येऊन नमाज पढा, मग पुन्हा मिरवणूक बघा' असा मह जमाल आणि तिच्या दासींना निरोप पाठवला. महजमाल उठली. तेव्हा पांढरी कफनी घातलेला एक फकीर मिरवणुकीतून तिच्याकडे बघत बघत निघून गेला. त्याचा चेहरा पिवळट होता, डोळे लाल होते. त्याच्या डोक्यावर काही वस्त्र नव्हते तसेच त्याचे पायही अन-वाणी होते. त्याचा चेहरा आणि वेश पाहून मह जमालला भीती वाटली. नमाज पढतानाही तिला त्याची आठवण येत होती. मिरवणूक पाहून ती रात्री झोपली तर तिला ती कफनी स्वप्नातही वारंवार दिसत होती. सकाळपर्यंत तिला जरासा ताप चढला. तिच्या आईला हे कळले. तिने काही मंत्र म्हणून एक ताईत गळयात बांधला आणि फकिरांना दान पाठवले.

दुपारपर्यंत ताप बराच वाढला. मह जमाल वारंवार दचकून उठे आणि 'तो पहा कफनीवाला आला, तो मला बोलावतो आहे. आई ग, तो बघ माझ्याकडे बघून हसतो आहे' असे किंचाळत असे.

आईने दासींना विचारले. त्यांनी सांगितले, "कफनी घातलेला एक फकीर काल संध्याकाळी मिरवणुकीतून चालला होता. बाई साहेब नमाजासाठी उठल्या तेव्हा पडदा जरा सरकला. फकिरानं यांना टक लावून पाहिलं. मग तो कुठेतरी निघून गेला."

खुर्शीद जमालने नोकरांना, तशा वर्णनाचा फकीर दिसल्यास त्याला घेऊन येण्यास सांगितले. नोकरांनी बराच शोध केल्यावर अखेर संध्याकाळी तो फकीर सापडला. खुर्शीद जमालने पड्याआडून त्याला मुलीची अवस्था सांगितली. तो म्हणाला, "मला आत घ्या, मी काही मंत्र म्हणेन, त्या मंत्रांनी ती बरी होईल."

खुर्शीद जमालने आत पडदे सोडण्याचा हुकूम दिला. फकीर पड्याबाहेर पलंगाजवळ उभा राहिला. त्याने डोळे मिटले आणि आपले दोन्ही हात आपल्या

गालांवर ठेवून बराच वेळ स्तब्ध उभा राहिला. मग तो म्हणाला, "आता ती बरी झाली आहे."

आणि खरोखरच मह जमालचा ताप उतरला होता. ती उठून बसली. खुर्शीद जमाल आणि दासींना खूपच अचंबा वाटला. त्यांनी फकिराला बसायला आसन दिले. नंतर दोन थाळयांमधे पैसे आणि कपडे ठेवून त्या त्याला देण्यासाठीं आणल्या. फकीर म्हणाला, "हे मी घेणार नाही. मला ती मुलगी दाखवा. नाही तर ती पुन्हा आजारी पडेल."

खुर्शीद जमाल पहिल्यांदा जरा चाचरली. पण फकीर साधू तर काय, आई-बापांसारखेच वंद्य असतात असा विचार करुन तिने पलंगासमोरचा पडदा दूर केला. मह जमालने फकिराला पाहिले. आणि तिची नजर खाली वळली. फकिराने मह जमालला पाहिले. तो बराच वेळ तिच्याकडे एकटक बघत होता. शेवटी 'भला हो बाबा' असे म्हणून तो उठला आणि निघून गेला.

तो तीस वर्षाचा होता. पण आजारी, अशक्त दिसत होता. त्याच्या चेह-यावर पिवळट छटा होती. डोळे रडून रडून सुजल्यासारखे दिसत होते. अंगावर फक्त पांढरी कफनी होती.

तो फकीर मह जमालच्या बागेतील माळणीचा मुलगा होता. एक वर्षा पूर्वी त्याने मह जमालला पाहिले होते. पण आपली गरिबी आणि मह जमालचे वैभव लक्षात घेऊन, महजमाल विषयी त्याच्या मनात निर्माण झालेली अत्यंत उत्कट प्रेमभावना कुणासमोर बोलून दाखवायची त्याला हिम्मत झाली नाही.

सहा महिने तो तळमळत होता. नंतर एक दिवस त्याला एक हिंदू योगी भेटला. त्याला त्याने आपली सर्व हकिगत सांगितली. योग्याने एक पांढरी कफनी दिली आणि "ही घातलीस तर तुझा सर्व त्रास नाहीसा होईल' असे सांगितले. कफनी घालताच तो एकदम उन्मनी अवस्थेत गेला आणि घरदार सोडून राना-वनात निघून गेला. सहा महिने तो असाच फिरत होता, सहा महिन्यानंतर तो प्रथमच गावात आला आणि त्याला पुन्हा मह जमालचे दर्शन झाले. परंतु आता त्याच्या दृष्टीत इतकी शक्ती आली होती की एका दृष्टिक्षेपाताच त्याने मह-जमालला आजारी केले.

14 सप्टेंबर 1850 रोजी एक रथ नजफगढ जवळ उभा होता आणि खाकी वेषातल्या सैनिकांनी त्याला गराडा घातला होता. त्या रथात खुर्शीद जमाल मह जमाल, आणि दोन दासी होत्या. त्यांच्याबरोबर बाहेर चार नोकर तलवारी घेऊन रक्षणार्थ उभे होते. शिपायांना रथाची झडती घ्यायची होती. त्यांना आत

कुणी बंडखोर असल्याची शंका होती. आत फक्त बायका आहेत, पडदा दूर करु नका असे बेगमच्या नोकरांचे म्हणणे होते. बाचाबाची वाढली आणि प्रकरण हातघाईवर आले. शिपायांनी चारही नोकरांना ठार मारले आणि रथाचा पडदा वर टाकला. बायकांजवळची दागिन्यांची पेटी त्यांनी काढून घेतली आणि निघून गेले. दरम्यान या गडबडीत रथाचा चालकही पळून गेला होता. बेगम आपल्या मुलीला आणि दासींना घेऊन नजफगढच्या दिशेने निघाली. इतक्यात काही गुजर लाठ्या घेऊन समोरुन आले. त्यांनी या बायकांकडे दागिने आणि कपडे मागितले. बेगम म्हणाली, "शिपायांनी सगळं लुटून नेलं. आता आमच्या पाशी काही नाही. तुम्ही वाटल्यास हा रथ घ्या." परंतु गुजरांनी ते ऐकले नाही. त्यांनी त्यांचे बुरखे फाडले आणि अंगावरची भारी वस्त्रेही काढून घेतली. खुर्शीद जमाल आणि दासींना त्यांनी शिव्यागाळीही करायला सुरुवात केली. एकाने खुर्शीद जमालच्या डोक्यात लाठीचा प्रहार केला. त्याबरोबर इतरांनीही दासींना लाठ्यांनी मारहाण करायला सुरुवात केली. मह् जमाल जरा अंतरावर घाबरुन उभी होती. पण कोणाचेच तिच्याकडे लक्ष गेले नाही. लाठीचा प्रहार डोक्यावर बसल्याने खुर्शीद जमाल कोसळली आणि थोडा वेळ तडफडल्यावर तिचा प्राण गेला. दासी देखील वर्मी घाव बसल्यामुळे मरण पावल्या. मह्जमाल हे सर्व बघत उभी होती. आईला मरताना पाहून तिने तिच्या अंगावर पडून आक्रोश केला. गुजर निघून गेले आणि मह्जमाल रडता रडता अखेर बेशुद्ध पडली. ती शुद्धीवर आली तेव्हा तिला तिच्या आईचे वा दासींचे प्रेते दिसेना. इतकेच नव्हे तर जंगलही दिसेना. जरा वेळाने आपण एका चारपाईवर झोपलो आहोत हे तिच्या लक्षात आले. समोर एक गाय बांधली होती. अंगणात काही कोंबड्या दाणे टिपत होत्या. चाळीस पन्नास वर्षाचा एक मेवाती[1] आपल्या बायकोशी बोलत बसला होता. मह्जमालला पुन्हा रडू आले. तिने मेवातिनीला[2] विचारले, "माझी आई कुठे आहे"? ती म्हणाली, "ती मेली, म्हणून तिला दफन केलं. तुला आम्ही इथे आणलं. तुला काही खायला हवं ? बघ खीर झाली आहे, खा." मह्जमाल म्हणाली, "मला भूक

---

१ कलिमा—मुसलमानांचा मूळ धर्ममंत्र

'लाइलह इल्ल'ल्लह मुहम्मद-उर्-रसूह'ल्लह'

अर्थ—एका परमेश्वरा शिवाय दुसरा परमेश्वर नाही आणि मुहम्मद त्याचा प्रेषित आहे.

२ फूलवालों की सैर—दिल्लीतला, हिंदू-मुसलमानांचा एक उत्सव.

नाही." आणि ती हुंदके देऊन रडू लागली. मेवातिन तिच्याजवळ आली आणि तिला समजावू लागली, "बाळ, शांत हो. रडल्यानं काय होणार ? आता तुझी आई जिवंत का होणार आहे ? आम्हाला मूलबाळ नाही. आम्ही आमच्या मुलीसारखा तुझा सांभाळ करू. हे घर तू आपलेच समज. तुझं नाव काय? तुझे वडील कुठे आहेत, तू कुठे जात होतीस ?—सगळं सांग."

महजमाल म्हणाली, "मी दिल्लीच्या बादशहाच्या खानदानातली आहे. माझे वडील अकरा वर्षांपूर्वी वारले. बंडाच्या गदारोळात आम्ही घर सोडून निघालो होतो. नजफगढमधे माझ्या वडिलांचा माळी राहतो त्याच्या घरी जात होतो. इतक्यात वाटेतच शिपायांनी आमची सगळी चीजवस्तू लुटली आणि नंतर गुजरांनी आईला आणि दोन्ही दासींना मारुन टाकलं." हे सांगताना तिला रडू अनावर झाले.

काही दिवस महजमाल त्या मेवातीच्या घरी आरामात राहिली. तिला आधीच्या आठवणी येत असल्या तरी मेवातिनीच्या प्रेमामुळे तिला कसलाच त्रास होत नव्हता. आयते जेवण-खाण मिळत होते. तरीही त्या घरच्या गरिबीने तिचा जीव गुदमरुन जाई आणि तिला पूर्वीच्या जमान्यातले आपले वैभव आठवत असे.

एका रात्री महजमाल आपल्या दत्तक आई-वडिलांजवळ झोपली असताना शेजारच्या झोपडीला आग लागली आणि ती या झोपडीतही शिरली. धुरामुळे महजमालला जाग आली आणि ती किंचाळत बाहेर धावली. मेवाती आणि त्याची बायको आत राहिलेले दागिने आणायला गेले, इतक्यात झोपडीचे जळते छप्पर अंगावर पडून दोघेही मरण पावले. आजूबाजूच्या लोकांनी मोठ्या मुश्किलीने आग विझवली महजमालचा हा निवारा देखील जळून खाक झाला.

शेजा या पाजा-यांनी सकाळी प्रेतांचे दफन केले. महजमालला एक पटवारी आपल्या घरी घेऊन गेला. त्याला दोन बायका आणि बरीच मुले होती. दिवस तर गेला. रात्री एक बायको म्हणाली, "ए पोरी, दूध चुलीवर ठेव." दुसरी म्हणाली, "ए आधी इकडे ये. माझ्या मुलाला झोपव." एकाच वेळी दोनदोन हुकूम ऐकून महजमाल गोंधळून गेली. तिने कधी दूध चुलीवर ठेवले नव्हते की कुणा पोराला अंगाई गाऊन झोपवले नव्हते. तरीही ती दूध चुलीवर ठेवायला निघाली. पण चुलीजवळ ठेच लागून दुधाचे मडके तिच्या हातातून निसटले आणि फुटले. सगळे दूध सांडले. मडके फुटल्याचा आवाज एकून पटवा-याची बायको धावत आली आणि सगळे दूध सांडलेले पाहून तिने महजमालला एक

जोरदार थप्पड मारली आणि ती तिला शिव्या देऊ लागली.

थप्पड आणि शिव्या खाण्याचा, महजमालच्या आयुष्यातला हा पहिलाच प्रसंग होता. ती थरथर कापत उभी होती. तिच्या कपडयांवरही दूध सांडले होते. ती कधी आपल्या कपडयांकडे तर कधी शिव्यांची लाखोली वाहात असलेल्या पटवा-याच्या बायकोकडे पाहात होती.

अखेर ती भिंतीला टेकून ढसढसा रडू लागली. तिला रडताना पाहून पटवा-याच्या बायकोचा पारा जास्तच चढला. तिने पायातली चप्पल काढून महजमालच्या मुस्कडात दोन-चारदा मारली आणि म्हणाली, "रडून मला धाक घालतेस होय? हडळ कुठली. तिथे त्या मेवातीला आणि त्याच्या बायकोला खाल्लंस. आता इथे कुणाचा घास घ्यायला आली आहेस ? सगळं दूध सांडलंस चुलीसमोर! अपशकुनी अवदसा कुठली. इडापिडा टळो आणि तुझी नजर माझ्या मुलांवर न पडो. खुदा जाणे, आणखी काय काय अरिष्टं तुझ्या पायगुणांनी येणार आहेत."

चपलांचा मार बसताच महजमाल कळवळली आणि तिने मार चुकवण्यासाठी चेहरा हातांनी झाकून घेतला. इतक्यात पटवारी आला. त्याने शिवीगाळ ऐकला तेव्हा तोही तिथे आला. महजमाल धावत आपल्या चारपाईजवळ जाऊन उभी राहिली. पटवा-याने बायकोला काय झाले ते विचारले. तिने सर्व प्रकार सांगितला. पटवारी म्हणाला, "जाऊ दे. गरीब आहे, चूक झाली असेल तिच्या हातून" यावर दुसरी बायको म्हणाली, "ही कसली आली आहे गरीब ? पक्की कामचुकार आहे. मी तिला सांगितलं की मुलाला झोपव. तर ऐकल्या न ऐकल्या सारखंच केलं. तुम्ही हिला बायको म्हणून घेऊन आला आहात की मोलकरीण म्हणून ? ही मोलकरीण असेल तर तिला काम करावं लागेल." पटवारी म्हणाला "मी तिला बेवारशी म्हणून घरी आणलं. तिला काम करायलाच पाहिजे. आपल्याला नाही तरी एक मोलकरीण हवीच होती."

महजमाल भीत भीत म्हणाली, "मला आजपर्यंत कधी काम करायची पाळी आली नाही. तुम्हीच मला शिकवा. माझ्याभोवती चार चार दासी सेवेला असायच्या. मला कधीच काम करावं लागलं नाही. आता नशीबानंच अशी वेळ आणली." असे म्हणता म्हणताच तिला पुन्हा रडू कोसळले.

पटवारी म्हणाला, "तू रडू नकोस. हळू हळू तुला सगळं काम येईल." मग महजमालला काही खायला देण्यात आले. पण तिला काहीच गेले नाही. ती तशीच उपाशी झोपली. सकाळ झाली, तशी पटवा-याच्या बायकोने एक हिसडा देऊन तिला उठवले, "अग ए ऊठ आता, किती झोपशील. चल ऊठ,

केर काढ."

दिलशाद, नरगिस, सुंदरी वगैरे दासी कशा हळुवारपणे उठवत असत त्याची महजमालला आठवण आली. ते दिवस तसे होते आणि हे असे. एक निःश्वास टाकून ती उठली आणि जुन्या सवयीप्रमाणे तिने दोन चार आळोखे पिळोखे दिले.

पटवाऱ्याच्या बायकोने पुन्हा एक हिसडा देऊन म्हटले "अग अवदसे, आता उठशील की नाही ?" आपण खरोखर मोलकरीण झालो, शहजादीपण संपले, याची महजमालला जाणीव झाली. ती ताबडतोब उठली. पण तिचे अश्रू वाहातच होते. पटवाऱ्याची दुसरी बायको म्हणाली, "नको ही मुलगी आपल्या घरी. भरल्या घरात बघावं तेव्हा रडत असते. असलं अवलक्षण इथे नको." इतक्यात पटवारी आला. त्याने बायकांच्या सांगण्यावरुन महजमालला ताबडतोब घरातून हाकलून दिले.

महजमाल पुन्हा रस्त्यावर आली. व्याकूळ होऊन तिने देवाला विचारले, "अल्ला, आता मी कुठे जाऊ?" इतक्यात तिला आपल्या माळणीची आठवण झाली. ती इकडेच कुठेतरी राहात होती आणि आई तिच्याच घरी यायला निघाली होती हेही आठवले.

तिला हे आठवत असतानाच अचानक तो कफनीवाला फकीर समोरुन आला आणि महजमालला पाहताच खिळल्यासारखा तिथेच उभा राहिला. या अचानक भेटीने महजमाल रडायची थांबली. तिच्यावरील संकटामुळे तिला कशाचेच भान न राहाणे स्वाभाविक होते. तरीही तो फकीर, त्याची कफनी आणि त्याच्या डोळ्यांकडे पाहताच तिच्या अंगात चमत्कारिक सळसळ होऊ लागली.

फकीर म्हणाला, "मलिका (स्वामिनी) तुम्ही इथे?" 'मलिका' शब्द ऐकताच महजमाल लाजेने खाली पाहात म्हणाली "नशिबामुळे मी इथे आले." नंतर तिने सर्व घटना सांगितल्या. फकीर म्हणाला, "माझं घर जवळच आहे. पण माझ्या कानावर हे काहीच कसं आलं नाही ! चला, माझ्या घरी चला."

महजमाल त्याच्या मागोमाग निघाली. फकिराने घरात जाऊन माळणीला महजमाल विषयी सांगितले. ती धावतच आली आणि तिने महजमालच्या पायांवर लोळणच घेतली. नंतर तिने महजमालला मोठया आदराने चारपाईवर बसवून म्हटले, "बाईसाहेब हे घर आपलंच आहे. मला या एका मुलाशिवाय कुणी नाही. आपल्या घराण्याच्या कृपेनं या घरात कशाचीही कमतरता नाही. तुम्ही या घराच्या मालकीण आहात, मी आणि माझा मुलगा तुमचे सेवक आहोत."

माळणीने महजमालला शक्य तितक्या आरामात ठेवले. इतके की, ती आपले

दु:खही थोडेफार विसरली. माळणीच्या मुलाकडे लांबून लांबून रोगी येत असत आणि तो त्यांचे रोग बरे करीत असे हे तिने पाहिले. फकीर आपल्या कफनीवर हात घासत असे. नंतर हात गालांवर ठेवून डोळे मिटत असे. काही वेळाने डोळे उघडून तो म्हणे "जा मेला तुझा रोग." आणि सर्व रोगी बघता बघता बरे होत असत.

महजमाल बरेच दिवस हा प्रकार बघत होती. शेवटी तिने माळणीला विचारले, "तुझ्या मुलात ही दैवी शक्ती कशी काय आली ? याने मला देखील पूर्वी अशाच प्रकारे बरं केलं होतं."

माळीण हात जोडून म्हणाली, "अभय देत असाल तर सांगते." महजमाल म्हणाली, "मी आता कुणाला काही शिक्षा तरी करु शकेन का ? निश्चितपणे सांग. माझं कुतुहल शमवायला म्हणून तरी सांग."

माळीण म्हणाली, "बाईसाहेब, माझ्या मुलाचं तुमच्यावर प्रेम बसलं होतं आणि तुमच्या विरहात तो नुसता वेडापिसा झाला होता. शेवटी एका योग्यानं त्याला ही कफनी दिली. त्याच कफनीतल्या दैवी शक्तीमुळे हजारो लोकांना फायदा होतो आहे. त्याच कफनीतल्या शक्तीमुळे तुम्ही माझ्या घरी आलात."

महजमालवर याचा बराच परिणाम झाला. काही दिवसांनी तिने माळणी-करवी काझीला बोलावून त्या फकिराशी लग्न केले.

माळणीने जन्मभर महजमालला इतके सुखात ठेवले की तिला कधी तिच्या बालपणाची आठवणही झाली नाही, मात्र फकिराने कफनी घालणे कधी बंद केले नाही त्याच्या कफनीची ख्याती दूरवर पसरली आणि अशा त-हेने महजमालचे भाग्यही पुन्हा त्याच कफनीमुळे उदयाला आले.

# सकीना खानम

नवाब फौलाद खानाचे प्रेत पहाडातल्या युद्धभूमीवरुन घरी आणण्यात आले तेव्हा त्यांच्या सुनेला प्रसववेदना सुरु झाल्या होत्या. तेव्हा दिल्लीत, जिथे शहर सोडून जिवानिशी पळण्याची तयारी चालली नसेल असे घर नव्हते. बादशहा बहादुरशहा लाल किल्ल्यातून हुमायूनच्या मकब-यात गेल्याची चर्चा होत होती.

नवाब फौलाद खान खानदानी श्रीमंत होते. परंतु त्यांच्या वडिलांच्या हातून काही चूक घडल्याने ते मोइनुद्दिन अकबर शाह यांच्या मर्जीतून उतरले आणि त्यांची मनसब आणि जहागीर काढून घेण्यात आली. त्या वेळी फौलाद खान तरुण होते आणि इंग्रजी फौजेत चाकरी करत होते. फौजेत बंड झाले तेव्हा तेही बंडात सामील झाले आणि आपले सैन्य घेऊन लढाईवर गेले. पहाडावर इंग्रजांनी मोर्चा बांधला होता. फौलाद खान अतिशय वीरश्रीने आणि हिमतीने लढले पण तोफेच्या गोळयाचा एक तुकडा त्यांना लागला आणि त्यांचा अंत झाला. शिपाई त्यांचे प्रेत घेऊन आले तेव्हा त्यांच्या सुनेला वेणा येत होत्या आणि दाई कुठेच मिळत नव्हती.

फौलाद खानचा तरुण मुलगा चारच दिवसांपूर्वी मारला गेला होता. बिचारी सून चार दिवसाची विधवा होती. सासू दोन वर्षापूर्वीच मेली होती. एकटया सास-याशिवाय कुणी वाली नव्हता. त्यांचे प्रेतच घरी आले तेव्हा सकीना खानमच्या डोळयासमोर अंधारी आली.

तसे घरात सर्व काही होते. एक सोडून चार चार दासी होत्या. पण आधाराच्या माणसाची गोष्टच वेगळी असते. सकीना खानमला सास-याच्या मरणाची बातमी कळताच ती दु:खातिरेकाने बेशुद्ध झाली.

अंगणात प्रेत ठेवले होते, दारात शिपाई उभे होते, ओसरीवरील एका पलंगावर सकीना बेशुद्ध होऊन पडली होती. सकीनाच्या उशा पायथ्याशी दोन दोन दासी बसल्या होत्या. दैवाचा हा दुर्विलास पाहून त्यांना रडू अनावर होत होते.

थोडया वेळाने सकीना खानम शुद्धीवर आली. वेदनेने व्याकूळ होऊन ती

दासीला म्हणाली. "देवडीवर कुणी शिपाई असेल तर त्याच्याकरवी तरी कुणी सुईण मिळते का पहा." दासी धावत गेली पण दरवाजातूनच उलटया पावली पळत आली. भीतीने तिची बोबडी वळली होती. ती म्हणाली, "बाईसाहेब, सगळया शिपायांना गोरे खाकी पकडून घेऊन जाताहेत. (त्या काळात इंग्रज शिपायांना 'गोरे खाकी' असे म्हणत असत) गोरे खाकी आपल्या घराजवळ आले आहेत. सकीना म्हणाली "अग दुष्टे, दरवाजा तरी बंद कर." दासी परत धावत गेली आणि तिने दरवाजे बंद केले. आता सकीनाच्या प्रसववेदना आणखी वाढल्या आणि अखेर तिने एका मुलाला जन्म दिला. त्यावेळी सुईण जवळ नव्हती की कसले बाळंतपणाचे सामानही नव्हते. जणू काही देवानेच तिची सुटका केली. परंतु अत्यंत थकव्याने सकीना लौकरच पुन्हा बेशुद्ध पडली. दासींनी बाळाला अंघोळ घातली आणि त्याला दुपटयात गुंडाळून मांडीवर निजवले.

समीनाचे वय तेव्हा केवळ सतरा वर्षांचे होते. लग्नाला केवळ सव्वा वर्ष झाले होते. तिचे माहेर फरुखाबाद मधे होते आणि ती मात्र दिल्लीला बंडाच्या गदारोळात होती. जरा शुद्ध येताच ती दासीला म्हणाली, "मला आधार देऊन उठव, बसते कर." दासी म्हणाली, "मुली असा अगोचरपणा करु नकोस. पडून रहा, तुझ्यात उठून बसण्याइतकी शक्ती तरी आहे का?" सकीना म्हणाली "बाई ग, आपल्याच सुख-आरामाचा विचार करायची ही वेळ नाही, नशिबात आणखी काय वाढून ठेवले आहे देव जाणे."

हे ऐकून दासीने आधार देऊन तिला उठवले आणि तक्क्याचा आधार देऊन बसवले. सकीनाने आधी आपल्या बाळाकडे वात्सल्यपूर्ण नजरेने पाहिले. या जगात तिला आता तो एकच आशेचा दीप होता. त्याच्याकडे बघतच राहावे असे तिला वाटले. पण तिला लाज वाटली आणि तिने तोंड फिरवले. तिची नजर अंगणात जाताच फौलादखानाचे प्रेत तिला दिसले. क्षणापूर्वीच्या तिच्या आनंदाचा चक्काचूर झाला. समजूतदार असून देखील ती सासऱ्याला उद्देशून वेडयासारखे बरळू लागली.

"या आपल्या अनाथ नातवाला पाहा. उठा, तुम्ही ज्याच्या येण्याकडे डोळे लावून बसला होता, तो आला आहे. याच्या बापाला वाढवलेत आणि शेवटी कबरीत झोपवलेत. आता यालाही कुशीत घेऊन कबरीत झोपा. मी या अवस्थेत याचा कसा सांभाळ करु? आपण ज्या घरात आलो आहोत ते घर संकटात आहे याची या छोटया पाहुण्याला काय कल्पना? दिल्लीत तुम्हीच माझे वडील होता व आज तुम्हीही गेलात. फरुखाबादमधे माझे वडील आहेत. पण

जिवंतपणीच आमची ताटातूट झाली आहे. या मुलालाही वडील होते, माझ्या जीवनाचे ते सर्वस्व होते. तेही गोळीला बळी पडले.''

असे बरळल्यावर सकीना थोडी सावरली व्याकूळ झालेल्या हृदयावर एक हात ठेवून डोके उशीवर ठेवून ती रडू लागली आणि रडता रडता पुन्हा बेशुद्ध पडली.

दासींनी तिला तसेच पडू दिले आणि त्या, फौलादखानाच्या अंत्यविधीसाठी कुणी मिळते का, ते पाहाण्यासाठी, दरवाजा उघडून बाहेर गेल्या. पण सगळ्या गल्लीत शुकशुकाट होता कुठे चिटपाखरु देखील दिसत नव्हते. तेव्हा एक दासी दुस-या दासीला म्हणाली, ''बाई ग, आपणाला जीव वाचवायला हवा.चला आपण इथून पळून जाऊ. बाईसाहेबांजवळ बसून राहिलो तर फुकट मरावे लागेल.'' दुसरी म्हणाली ''अशा संकटात मालकिणीला सोडून जायचे आणि आपला जीव वाचवायचा हे फार कृतघ्नपणाचे होईल. त्यातही त्या अश्राप पोरासकट तिला एकटे टाकायचे ?'' यावर पाहिली उत्तरली, ''कसली इमानदारी आणि कसले प्रेम ? वेडबीड तर नाही ना लागले तुला ? अग शरीरात प्राण असले तरच या गोष्टी. मी तर चालले. तुला काय करायचे असेल ते कर. गोरे खाकी आता येतच असतील. ते येतील, सगळे घर लुटतील आणि आपल्याला सगळयांना मारुन टाकतील .'' हे एकून दुस-या दासीनेही मन घट्ट केले. तिने तिस-या आणि चौथ्या दासीलाही जवळ बोलावले आणि त्या चौघीनींही पळून जायचे ठरवले. एकजण म्हणाली ''जायचेच आहे तर काही पैसे घेऊन तरी जाऊ. सकीना बेशुद्ध पडली आहे. तिच्या उशाखालून किल्ली घ्या, तिजोरीतून पैशाची पेटी काढून घ्या आणि चला.''

जिच्याजवळ मूल होते तिला दया आली. ती म्हणाली ''याला कुठे ठेवणार ?'' एकजण म्हणाली ''ठेव त्याच्या आईजवळ.'' पहिली म्हणाली ''नाही बाई. मी याला आपल्याबरोबर घेऊन जाईन'' यावर बाकीच्या दासी एकसुरात बोलल्या ''वा ! काय पण उमाळा आला आहे पाहा ! आपला जीव वाचायची मारामार. त्यात या मुलाला कशी वाचवशील ? आणि याच्याशिवाय तर सकीना तडफडून मरेल. तुला काही दया माया आहे की नाही ?'' पहिली म्हणाली, ''तुम्ही बिचा-या सकीनाला सोडून चालला आहात, तुम्हालाच काही दयामाया नाही. मी या बाळाला घेऊनच जाईन. माझ्या मुलीला मी हे बाळ देईन. नुकतेच तिचे मूल मरण पावले. ती याचा चांगला सांभाळ करेल. याला इथे ठेवले तर त्याच्या आईबरोबर हे देखील मरेल.''

अखेर त्या चौघीही जणी, रोकड पैशाची पेटी आणि मूल घेऊन निघाल्या आणि आपापल्या घरी निघून गेल्या. आता सकीना त्या घरात एकटी राहिली. त्या प्रेताखेरीज तिच्याजवळ कुणीही नव्हते.

प्रसूतीमुळे सकीना अतिशय अशक्त झाली होती. चार तास ती बेशुद्ध होती. ती शुद्धीवर आली तेव्हा रात्रीचे आठ वाजले होते. घरात सगळीकडे अंधार होता. तिने डोळे फाडफाडून सगळीकडे बघायचा प्रयत्न केला. पण काहीच दिसले नाही तेव्हा आपण मेलो आहोत आणि हा काळोख कबरीतला काळोख आहे असे तिला वाटले. तिने कलिमा (मुसलमानांचा पवित्र मंत्र) म्हणायला सुरूवात केली. "माझा धर्म इस्लाम. माझा प्रेषित मुहम्मद. ईश्वर माझा पालनकर्ता. तो एकमेव आहे. त्याच्यासारखा दुसरा कुणी नाही. या अल्लाह, मी निरपराध आहे. मला कबरीच्या काळोखात ठेवू नकोस. मला स्वर्गाचा प्रकाश दाखव." थोड्या वेळाने तिचे लक्ष आकाशात चमकणाऱ्या चांदण्यांकडे गेले. आपण जिवंत आहोत आणि कबरीत नसून पलंगावर झोपलो आहोत हे तिच्या लक्षात आले. मग तिने दासींना हाका मारायला सुरूवात केली. कोणीच उत्तर दिले नाही तेव्हा ती घाबरली, आणि उठून बसली. भीतीने तिच्या अंगात बळ आले म्हणा, किंवा तिला अशक्तपणाचा विसर पडला म्हणा, ती पलंगावरून उतरली. तिने दिवा लावून पाहिले, तेव्हा घरात कुणी नाही हे तिच्या लक्षात आले. अंगणात तिच्या सासऱ्याचे प्रेत पडले होते. रात्रीच्या वेळी ते प्रेत पाहून ती फार घाबरली आणि किंचाळू लागली. गल्लीत कुणी असते तर तिच्या किंचाळ्या ऐकून धावत आले असते. पण वस्तीतले सगळे लोक केव्हाच पळून गेले होते. किंचाळत असतानाच सकीनाला मूर्च्छा आली आणि ती धाडकन फरशीवर पडली. रात्रभर ती तशीच फरशीवर पडली होती. सकाळी दिवस बराच वर आला तेव्हा तिने डोळे उघडले. मन खंबीर केले. तिने दोन वेळचे अन्नदेखील खाल्ले नव्हते. पण संकटच माणसाला हिम्मत देते. शिवाय वीरांच्या घरात बालपण गेल्यामुळे तिचे मन इतर बायकांसारखे हळवे नव्हते. सासऱ्याच्या प्रेताचे दफन करायची काही व्यवस्था करायला हवी हे तिच्या लक्षात आले. तसेच ती भुकेने कासावीस झाली होती. तेव्हा आपण काही खायला हवे असे तिने ठरवले. अचानक तिला आपल्या मुलाची आठवण झाली आणि तिच्या काळजात वात्सल्याची जणू कळ उठली वेडीपिशी होऊन ती घरभर आपल्या मुलाला शोधू लागली. पाण्याच्या माठावरची झाकणे काढून देखील ती पाहू लागली. मूल कुठेच दिसेना तेव्हा पलंगावरच्या उशा छातीशी कवटाळून ती रडू लागली.

अखेर दु:ख नेच तिला धैर्य दिले. सास-याच्या प्रेताचे दफन करायला हवे याची तिला पुन्हा आठवण आली. तिने कपाटातून एक पांढरी चादर काढून त्या हुतात्म्याच्या प्रेतावर पांघरली आणि नमाजाची चटई अंथरुन ती त्यावर डोके टेकून बसली आणि रडत रडत ईश्वराची करुणा भाकू लागली.

"हे परमेश्वरा, तुझ्या भक्ताच्या या प्रेताच्या नशिबी कफन ( प्रेतावर पांघरायचे वस्त्र ) नाही आणि दफन ( रीतसर अंत्यविधी ) देखील नाही. याच्या नशिबी कबर नाही आणि शेवटचा नमाजही नाही. याच्यासाठी नमाज पढण्याकरता देवदूतांनाच पाठव. आपल्या कृपेच्या कुशीत याचे दफन कर. मला सगळ्यांनी धोका दिला आहे. माझ्या हृदयाचा सम्राटही या जगातून निघून गेला. माझा पोटचा गोळादेखील माझ्यापासून हिरावला गेला. आता तूच माझा रक्षणकर्ता. या निराधार स्त्रीची करुणा ऐक आणि माझ्या हाकेला धावून ये."

सकीना खानम अजून करुणा भाकतच होती इतक्यात दरवाजा उघडून खाकी गणवेश घातलेले चार शिपाई आत आले. सकीनाने डोके वर केले आणि परपुरुषांना आत येताना पाहून चेहरा चादरीने झाकून घेतला. भीतीने कोप-यात लपावेसे तिला वाटले, पण शिपाई आत आले होते. त्यांनी सकीनाला पकडले आणि जबरदस्तीने तिच्या चेह-यावरची चादर काढली. "वा ! जवान आहे ! खूबसूरत देखील आहे" ते ओरडले.

मग त्यांनी सकीनाला सोडून घराची झडती घ्यायला सुरुवात केली रोकड ऐवज तर दासीच घेऊन गेल्या होत्या. मात्र काही दागिने आणि भारी कपडे त्या शिपायांना मिळाले. मग ते पुन्हा अंगणात आले आणि त्यांनी प्रेतावरची चादर काढून फेकली. "अरे, हा कुणी बराच मोठा विद्रोही दिसतो" ते म्हणाले.

मग शिपायांनी सकीनाला दंडाला धरुन उभे केले आणि आपल्याबरोबर यायला सांगितले. सकीना मुकाटयाने उभी राहिली. 'मी बाळंतीण आहे, भुकेली आहे, मला छळू नका' असे काहीच तिच्या तोंडून आले नाही. घरंदाज प्रतिष्ठा आणि सभ्यता तिच्या अंगी होती त्यामुळे तिच्या तोंडून शब्द फुटेना.

शिपाई तिला ओढत घेऊन निघाले.' ती दरवाजापर्यंत आली तेव्हा तिने वळून घराकडे पाहिले आणि एक निश्वास टाकून ती म्हणाली. "माझ्या सासरच्या घरा, तुला अखेरचा सलाम. कफन आणि कबर देखील नशिबी नसलेल्या माझ्या सास-याला सलाम. मी या शूर वीराची इज्जत होते. हे जर जिवंत असते तर

माझ्या लाजेसाठी यांनी प्राणांची कुर्वंडी केली असती." सकीनाच्या या विलापावर शिपाई क्रूरपणे हसले आणि तिला ओढत घेऊन निघाले. सकीना थोडा वेळ मुकाटयाने चालत राहिली पण सहन करवेना तेव्हा ती म्हणाली "मी बाळंतीण आहे माझ्यावर दया करा. मी भुकेली आहे मला छळू नका मी तुमच्या मुलुखातली आहे तुमच्याच धर्माची आहे. मी निरपराध आहे."

हे ऐकताच चारी शिपाई थांबले आणि दिलगिरीच्या स्वरात तिला म्हणाले, "तू घाबरु नकोस. तुझ्यासाठी आम्ही वाहनाची व्यवस्था करतो." नंतर तिघेजण तिच्याजवळ थांबले आणि एकजण वाहन आणायला गेला. थोडयाच वेळात तो जखमींना घेऊन जायची गाडी घेऊन आला. तिच्यात सकीनाला बसवून ते तिला पहाडावरच्या गो-या छावणीत घेऊन गेले.

त्यानंतर बंडाच्या धुमश्चक्रीत सकीनावर काय काय प्रसंग ओढवले, ती कुठे कुठे राहिली, तिला कोण कोणच्या संकटातून जावे लागले याबद्दल काहीच माहिती नाही. त्या प्रसंगानंतर बारा वर्षे गेली. त्यानंतर एक दिवस ती रोहतकमधल्या एका गल्लीत भीक मागत होती. तिचे पाय अनवाणी होते, सलवार फाटली होती. कुडता अतिशय मळका फाटका होता, त्याला ठिकठिकाणी ठिगळे लावली होती. दुपट्टा फाटून चिंध्या झाल्या होत्या. ती अत्यंत भुकेली दिसत होती. हाडांवर कुठेही मांस नव्हते, केवळ कातडे शिल्लक होते. तिच्या डोळयाभोवती काळी वर्तुळे दिसत होती. डोक्यावर केसांच्या नुसत्या झिज्या झाल्या होत्या. डोळयांच्या निसर्गदत्त सौंदर्याला भकास कळा आली होती. तिला चालताना घेरी येत होती. अधूनमधून ती एखाद्या भिंतीचा आधार घेऊन डोके टेकीत असे आणि जरा दम खाल्ल्यावर लटपटत्या पायांनी पुन्हा चालायला लागत असे.

काही अंतरावर एका घरी लग्न होते. शेकडो लोक जेवून बाहेर येत होते. सकीना तिथे थांबली आणि केविलवाण्या स्वरात म्हणू लागली "मी नशिबाच्या फे-यात सापडलेली आहे, मोठया घराण्याची सून आहे. पण आज अब्रू घालवून, लाज गुंडाळून तुमच्या पुढे पदर पसरते आहे. साहेब, भाकरीचा एक तुकडा या गरिबाला द्या तुमचे भले होईल. (नवरदेवाच्या) बाशिंगाचे भले होवो, घोडयाचे भले होवो. जोडयाचे (देखील) भले होवो. एकच तुकडा घाला गरिबाला."

फकिरांच्या आरडाओरडयात सकीनाचा आवाज कुणाच्याच कानी गेला नाही. उलट लग्नघरात व-हाडाची व्यवस्था बघणा-या एका नोकराने तिला इतक्या जोरात धक्का देऊन खाली पाडले की ती कळवळून म्हणू लागली "मी

तीन दिवसापासून काही देखील खाल्ले नाही. मला मारु नकोस, आधीच नशिबाचा जोरदार फटका मी खाल्ला आहे. हे देवा, मी कुठे जाऊ ? माझी कर्मकहाणी कुणाला सांगू?" एक लहान मुलगा हे सर्व बघत होता. त्याला सकीनाची दया आली. त्याचे डोळे पाणावले. त्याने सकीनाला हात देऊन उठवले आणि म्हणाला "चल, माझ्याबरोबर चल. मी तुला खायला देतो."

त्या मुलाच्या आधाराने सकीना कशीबशी उठली. तो मुलगा जवळच्याच एका घरात नोकर म्हणून कामाला होता. तिथे तो सकीनाला घेऊन गेला आणि लग्नघरातून आलेले आपल्या वाटयाचे जेवण त्याने तिच्यासमोर ठेवले. सकीनाने दोन घास खाल्ले, पाणी प्यायली आणि तिच्या जरा जिवात जीव आला. तिने त्या मुलाला तोंड भरुन आशीर्वाद दिला.

तिने त्या मुलाला नीट निरखून पाहताच तिला गलबलून आले आणि ती त्याला जवळ घेऊन रडू लागली. त्या मुलालाही रडू आवरेना. सकीनाने विचारले, "तू कुणाचा मुलगा आहेस ?" तो म्हणाला, "माझी आई या घरात दासी आहे. मी देखील या घरात नोकर आहे." सकीनाने विचारले. "तुझी आई कुठे आहे ?" मुलगा म्हणाला, "आमची मालकीण आहे ना, तिच्याबरोबर माझी आई आणि आजी लग्नाला गेल्या आहेत"

हे ऐकून सकीना गप्प बसली. पण या मुलाविषयी आपल्याला इतके प्रेम का दाटून येते आहे ते तिला कळेना. त्याने तिच्यावर दया केली होती. पण केवळ दयेमुळे कुणाचे असे आतडे तुटत नाही.

इतक्यात मुलाची आई आणि आजी घरी आल्या. सकीनाने त्याच्या आजीला ओळखले. बंडांच्या वेळी तीच सकीनाकडे दासी म्हणून कामाला होती आणि तीच तिच्या मुलाला घेऊन गेली होती. दासीने मात्र सकीनाला ओळखले आहे असे दिसेना पण सकीनाने तिला हाक मारली आणि आपले नाव सांगितले तेव्हा ती दासी सकीनाच्या गळयात पडून रडू लागली.

सकीनाच आपली खरी आई आहे हे कळताच तो मुलगाही सकीनाला मिठी मारुन रडू लागला. सकीनाने मुलाला उराशी कवटाळले आणि आभाळाकडे पाहात ती म्हणाली. "हे खुदा, तुझी लीला अगाध आहे. माझ्या मुलाला बंडाच्या गदारोळातही जिवंत ठेवलेस आणि बारा वर्षानंतरही आम्हा मायलेकरांची भेट घडवून आणलीस, माझे भाग्य उजळविलेस. तुझे आभार कसे मानू ?"

नंतर सकीनाने फरुखाबादला आपल्या माहेरी पत्र पाठवले. तिचे आई

वडील तोवर मरण पावले होते, पण तीन भाऊ होते, ते रोहतकला आले आणि आपल्या बहिणीला व भाच्याला आपल्याबरोबर घेऊन गेले. मुलाने, त्याचे पालनपोषण करणाऱ्या त्या दासीला आणि तिच्या मुलीलाही आपल्या बरोबर घेतले आणि फरुखाबादला जाऊन त्या सर्वांनी आपले उर्वरित आयुष्य सुखात घालवले.

# सब्जपोश[1]

1857 च्या बंडाच्या वेळी जे ऐन जवानीत होते, असे काही म्हातारे एक आठवण नेहमी सांगतात. इंग्रजी फौजेने पहाडांवर मोर्चे बांधले होते आणि काश्मीरी दरवाज्याच्या बाजूने दिल्ली शहरावर तोफांच्या गोळयांची बरसात होत होती. त्या वेळी एक म्हातारी मुसलमान स्त्री हिरवा वेष धारण करुन दिल्लीच्या बाजारामधे फिरत असे आणि उंच, खणखणीत आवाजात म्हणत असे, "चला, उठा, खुदानं तुम्हाला स्वर्गात बोलावलं आहे."

शहरातले लोक हे ऐकून तिच्याजवळ गोळा होत. मग ती त्या सर्वांना घेऊन काश्मीरी दरवाज्यावर हल्ला चढवत असे आणि संध्याकाळ होईपर्यंत खूप लढत असे.

ज्या लोकांनी तिला प्रत्यक्ष पाहिले आहे ते सांगतात की ती खूपच धाडसी होती. मृत्यूचे भय तिला ठाऊकच नव्हते. तोफेचे गोळे आणि बंदुकीच्या गोळयांच्या बरसातीत ती शूर शिपायाप्रमाणे पुढे पुढे घुसत असे. कधी ती पायी असायची तर कधी घोडयावर स्वार. तिच्याजवळ एक तलवार, एक बंदूक आणि एक झेंडा असे. तिला बंदूक फार चांगली चालवता येत असे. तिच्याबरोबर इंग्रजांच्या पहाडांवरच्या मोर्च्यावर लढायला गेलेल्यांपैकी एका व्यक्तीने सांगितले की ती तलवार चालवण्याच्या कलेतही निपुण होती. कित्येकदा समोरुन येणा-या फौजेशी ती समोरासमोर तलवारीने लढत असे.

त्या स्त्रीचे साहस पाहून शहरातल्या जनतेतही खूप उत्साह निर्माण होत असे आणि ते दुप्पट हिम्मतीने हल्ले करत असत. परंतु त्यांना लढाईचे शास्त्रीय ज्ञान नसल्यामुळे बहुधा माघार घ्यावी लागत असे. लोक पळायला लागले की ही स्त्री त्यांना थांबवण्याचा खूप प्रयत्न करत असे. आणि अखेर नाइलाजाने स्वतःही परत येत असे. मात्र परत आल्यानंतर ती कुठे जाते आणि पुन्हा कुठून येते याची कुणालाही माहिती नसे.

अशा त-हेने ती रोज लढत असे. एक दिवस अतिशय जोशात बंदुकीचे नेम धरत, तलवार चालवत ती मोर्चापर्यंत गेली आणि तिथे जखमी होऊन

---

१ हिरवे कपडे घातलेली, शोकसूचक कपडे घातलेली.

घोडयावरुन खाली कोसळली. इंग्रजांच्या फौजेने तिला कैद केले. मग ती कुठे गेली, तिचा अंत कसा झाला याविषयी कुणालाच काही माहिती नाही.

दिल्लीला ज्या दिवसात वेढा घालण्यात आला होता त्या दिवसात इंग्रज सेनेच्या अधिका-यांनी लिहिलेली काही पत्रे, दिल्ली प्रदेश सरकारने प्रसिद्ध केली आहेत. त्यात, लेफ्टनंट डब्ल्यू.एस.आर. हडसन नावाच्या अधिका-याने अंबाल्याचे डेप्युटी कमिशनर मिस्टर जे. गिल्सन फॉरसाइथ यांना 27 जुलै 1857 रोजी लिहिलेले एक पत्र आहे. या पत्रात त्या वृद्ध मुसलमान स्त्रीबद्दल थोडीफार माहिती मिळते. पत्राचा मसुदा काहीसा असा आहे.

प्रिय फॉरसाइथ,

मी तुमच्याकडे एका म्हाता-या मुसलमान बाईला पाठवत आहे. ही जरा चमत्कारिक स्त्री आहे. ही हिरवे कपडे घालून शहरातल्या लोकांना बंड करण्यास उद्युक्त करते आणि स्वतः हातात हत्यार घेऊन त्यांचे नेतृत्व करत आपल्या मोर्च्यांवर हल्ले करते.

ज्या शिपायांविरुद्ध ती लढली आहे ते सांगतात की, हिने अनेकदा अतिशय धाडसी हल्ले केले आहेत. ही अतिशय बेदरकारपणे शस्त्र चालवते तसेच हिच्यात पाच पुरुषांचे बळ आहे.

ज्या दिवशी हिला गिरफ्तार केले त्या दिवशी ही घोडयावर स्वार होती आणि शहरातील बंडखोर लोकांना लढण्यासाठी उत्तेजन देत होती. तिच्याजवळ बंदूक होती. तिने अनेक गोळया झाडल्या. तलवार आणि बंदूकीने तिने आपल्या ब-याच शिपायांची दाणादाण उडवली. परंतु आपल्याकडच्या शिपायांच्या अपेक्षेप्रमाणेच अखेर घडले. तिचे साथीदार पळून गेले. आणि ही जखमी झाल्याने गिरफ्तार झाली. तिला जनरल साहेबांसमोर उभे करण्यात आले तेव्हा त्यांनी बाईची जात म्हणून तिला सोडून द्यायचा हुकूम दिला. परंतु मी त्यांना सांगितले की जर हिला सोडून दिले तर ती पुन्हा शहरात जाऊन आपल्यात काही अदृश्य शक्ती असल्याचा दावा करेल आणि तिला सोडून देण्यात आले म्हणजे तिच्यात खरोखरच काही दैवी शक्ती आहे असे लोकांनाही वाटेल. त्यामुळे पुढे ही स्त्री, फ्रान्सच्या क्रांतीच्या इतिहासात प्रसिद्ध असलेल्या स्त्रीप्रमाणे आपल्याला त्रासदायक ठरण्याचा संभव आहे. (फ्रान्समधे क्रांतीच्या वेळी जोन ऑफ आर्क नावाची अशीच एक स्त्री शत्रूशी लढत असे. तिच्यात काही दैवी शक्ती आहे असे मानून हजारो लोक तिच्या बाजूचे झाले आणि त्यानंतर भयंकर युद्ध झाले, घनघोर रक्तपात झाला. ती कधीही मरणार नाही असेच सामान्य लोकांना वाटत असे.

अखेर तिच्या शत्रूसैन्याने तिला जिवंत जाळले तेव्हा कुठे तिचा उपद्रव थांबला. त्या जोन ऑफ आर्कशी या सब्जपोश स्त्रीची पत्रात तुलना करण्यात आली आहे.
—हसन निजामी)

जनरल साहेबांनी माझे म्हणणे मान्य केले आणि या स्त्रीला अटक करण्याचा आदेश दिला. म्हणून या स्त्रीला आता तुमच्याकडे पाठवत आहोत. हिला सक्त पहा-यात ठेवण्याची योग्य ती व्यवस्था करावी, कारण ही फार भयंकर स्त्री आहे.—हडनस"

# बहादुरशाह जफर

माझ्या स्वर्गीय आईने तिचे वडील हजरत शाह गुलाम हसन साहेब यांच्या कडून ऐकलेली गोष्ट मला सांगितली होती की त्या दिवशी बहादुर शाह दिल्लीच्या किल्ल्यातून बाहेर पडले ते थेट हजरत निजामुद्दिन औलिया यांच्या दर्ग्यात पोहोचले. त्या दिवसात बादशहा काहीसे दुःखी आणि भ्यालेले दिसत असत. पालखी वाहून नेणारे (भोई) आणि काही निवडक खासगी नोकरच तेवढे बरोबर घेतले. चिंता आणि भीतीने बादशहांचा चेहरा उतरला होता. शुभ्र दाढी धुळीने माखली होती. बादशहांच्या आगमनाची वार्ता ऐकून नाना साहेब (पेशवे) दर्ग्यात आले. बादशहा कबरीच्या मस्तकाच्या बाजूला दरवाज्याला टेकून बसले होते. नानासाहेबांना पाहाताच नेहमी प्रमाणेच त्यांचा चेहरा उजळला. ते म्हणाले "हे शिपाई एक ना एक दिवस फितूर होतील, त्यांच्यावर विश्वास ठेवणं चूक आहे हे मी तुला मागेच म्हटलं होतं. मी म्हटल नव्हतं-? हे शिपाई स्वतः बुडतीलच आणि मलाही बुडवतील. तसंच झालं. पळून आलो बघ. मी तर मोह-माया-सगळयांचा त्याग केलेला फकीर आहे. पण शेवटच्या क्षणापर्यंत लढत राहाणा-या माझ्या रक्ताला कसा विसरु? माझ्या पूर्वजांवर याहून कठीण प्रसंग गुदरले होते पण त्यांनी हिम्मत सोडली नाही. मला माझा अंत आधीच दिसायला लागला आहे. हिंदुस्तानच्या सिंहासनावरचा तैमूरलंगचा शेवटचा वारस मी ठरणार यात शंका नाही. मुगल सत्तेचा दीप आता काही क्षणात विझणार हे स्पष्ट दिसतं आहे. मग जाणून बुजून रक्त कशाला सांडवू? म्हणून किल्ला सोडून आलो. सगळा मुलुख खुदाचा आहे. ज्याला पाहिजे त्याला तो देईल, शेकडो वर्षं आमच्या वंशानं हिंदुस्तानवर बहादुरीनं राज्य केलं. आता दुस-यांची पाळी. ते राज्य करतील. बादशहा म्हणवतील. आणि आम्ही त्यांच्याकडून पराभूत होऊ. यात दुःख ते कसलं? शेवटी आम्ही देखील कुणाला तरी बरबाद करूनच आमचं घर वसवलं होतं ना? "असं निराशा-जनक बोलून बादशहांनी एक पेटी काढली आणि ती नाना साहेबांना देत

म्हटलं "हे घ्या तुमच्या हवाली करतो आहे. पूज्य तैमूरनं कॉंस्टंटीनोपलवर विजय मिळवला तेव्हा तिथल्या सुलतानाच्या खजिन्यात ही अमूल्य वस्तू हाती लागली. यात पूज्य पैगंबराच्या दाढीचे पाच केस आहेत. आजही आमच्या घराण्यात ही अत्यंत अमूल्य आणि पवित्र वस्तू मानली जाते. आता मला आकाश-धरती कुठेच थारा नाही. त्यात ही पेटी कुठे सांभाळू? तुमच्याशिवाय हिचा सांभाळ करणारं कुणी नाही. हे घ्या. तुमच्याजवळ ठेवा. माझ्या हृदयाचा-डोळयांचा हा निवारा. आजच्या संकटाच्या वेळी माझ्यापासून दुरावतो आहे." नानासाहेबांनी ती पेटी घेतली आणि दरग्या-च्या कोठारात नेऊन ठेवली. आजही ती तिथे आहे. हिजरी वर्षाच्या तिस-या महिन्यात तिचं भाविकांना दर्शन घेता येतं.

बादशहांनी नानासाहेबांना म्हटलं "जेवणाच्या तीन वेळा टळून गेल्या पण अन्न मिळालं नाही. तुमच्या घरी काही शिजवलं असेल तर आणा." नानासाहेब म्हणाले की, "आम्ही देखील मृत्यूच्या दारातच उभे आहोत. स्वयंपाकाची कुठली शुद्ध? घरी जातो आणि काही असेल तर घेऊन येतो. त्यापेक्षा आपण स्वत:च चलावं. जो पर्यंत माझ्या जिवात जीव आहे आणि माझी मुलं जिवंत आहेत तोवर आपल्याला कुणी हातही लावू शकणार नाही. आम्ही मेलो तरच आपल्याला काही होईल."

बादशहा म्हणाले "तुम्ही एवढं म्हणता आहात हाच तुमचा मोठेपणा. पण म्हाता-या शरिराच्या चोचल्यांसाठी थोर पुरुषांच्या संततीचे प्राण मी संकटात टाकणार नाही. दरग्याचं दर्शन घेतलं, माझी अमूल्य ठेव तुमच्या हवाली केली. आता दोन घास खाल्ले की हुमायूनच्या मकब-यात जाईन. तिथे जे नशिबात असेल ते होईल."

नानासाहेबांनी घरी येऊन विचारलं "काही खायला आहे का?" बेसनाची भाकरी आणि चटणी आहे-असं त्यांना उत्तर मिळालं मग त्यांनी एका थाळीत ते अन्न ठेवून झाकून आणलं. बादशहांनी ती बेसनाची भाकरी खाऊन पाणी प्यायले आणि देवाचे आभार मानले. नंतर ते हुमायूनच्या मकब-यात गेले. तिथे त्यांना अटक करुन रंगूनला पाठवण्यात आलं. रंगून-मधेही बादशहांची फकिरी वृत्ती कायम होती. संतुष्ट, आणि परमेश्वरावर भरवसा ठेवणा-या फकिरासारखंच त्यांनी आपलं ऊर्वरित जीवन व्यतीत केलं.

# मिर्झा नसीर-उल्-मुल्क

ही दिल्ली आहे. हिंदुस्तानचे हृदय-आणि राजसत्तेचे आसन. त्या काळात हे शहर भरभराटीला आले होते. मोंगलांच्या वंशाचा शेवटचा दिवाही विझण्याच्या बेतात होता. संकट कोसळले तेव्हा इथल्या रहिवाशांची वागणूकही बदलली.

थोरा मोठयांची वागणूक बदलली तशी जनताही दुराचारी होऊ लागली. त्याचाच परिणाम म्हणून राजा आणि प्रजा-दोघेही धुळीला मिळाले. उदाहरणे अनेक आहेत पण मी परमेश्वराची अवकृपा म्हणजे काय असू शकते हे सांगणारी एकच बोध्‌प्रद कहाणी हिंदुस्तानच्या रहिवाशांना, विशेषतः मुसलमान आणि सूफी (साधू संत) लोकांना सांगणार आहे.

× × ×

बंडाच्या एक वर्ष आधी काही शहजादे (राजकुमार) दिल्ली बाहेर जंगलात शिकारीला गेले होते. दुपारच्या कडक उन्हात हिरव्यागार फांद्यां-वर बसलेल्या चिमण्यांना आणि पारव्यांना गोफणीने दगड मारुन खाली पाडण्याचा उद्योग त्या शहजाद्यांनी चालवला होता. इतक्यात ठिगळे लावलेली कफनी घातलेला फकीर तिथे आला. शहजाद्यांना अतिशय आदबीने सलाम करुन तो म्हणाला, "राजकुमारांनो, या मुक्या प्राण्यांना का छळता? यांनी तुमचं काय वाकडं केलं आहे? यांनाही जीव आहे. तुमच्यासारखंच यांनाही दुःख, त्रास होतो, पण बिचा-या बोलू शकत नाहीत. तुम्ही बादशहाचे पुत्र आहात. राजानं आपल्या राज्यात राहणा-या सर्वांवर प्रेम केलं पाहिजे आणि त्यांना संरक्षण द्यायला पाहिजे. हे पक्षी देखील तुमच्या राज्याचे रहिवासी आहेत. त्यांना तुम्ही न्याय आणि दयाबुद्धीनं वागवलत तर बादशाहाच्या गौरवात भरच पडेल."

अठरा वर्षाच्या थोरल्या राजकुमाराने शरमेने गोफण खाली टाकली. परंतु धाकटा शहजादा मिर्झा नसीर-उल-मुल्क संतापून म्हणाला "अरे जा जा. कवडी मोलाचा तू माणूस आणि आम्हाला अक्कल शिकवतोस? शिकार सगळेच करतात. आम्ही केली तर त्यात काय बिघडलं?" फकीर

म्हणाला "सरकार, रागावू नका. शिकार अशा प्राण्याची करावी की ज्याला मारलं तर चार पाच जणांचं पोट तरी भरेल. या छोटया चिमण्यांना मारुन काय मिळणार ? वीस पंचवीस मारल्या तरी एकाचंही पोट नाही भरणार." फकिराच्या या उपदेशाने नसीर मिर्झाला अधिकच संताप आला आणि त्याने गोफण ताणून नेम धरुन एक दगड त्या फकिराच्या गुडघ्यावर इतक्या जोरात मारला की तो खालीच कोसळला. "स्स् हाय पाय मोडला माझा." तो कळवळून म्हणाला.

फकीर खाली पडताच शहजादे घोडयावर स्वार होऊन किल्ल्याच्या दिशेने निघून गेले. थोडया वेळाने फकीर उठून लंगडत कबरस्तानाकडे (स्मशानभूमिकडे) निघाला. चालता चालता त्याची, स्वतःशीच बडबड चालू होती. "ज्याचे राज्यकर्ते इतके जुलमी आहेत ते सिंहासन टिकेलच कसं ? पोरा, तू माझा पाय मोडलास, खुदा तुझेही पाय मोडो आणि तुलाही असंच दुःखदैन्य देवो."

× × ×

तोफा गरजत होत्या, गोळयांची बरसात होत होती. सर्वत्र प्रेतांचा खच दिसत होता. दिल्ली शहर ओस पडत होते. त्याच वेळी लाल किल्ल्यातून तेच शहजादे भयभीत होऊन घोडयावर स्वार होऊन पहाडगजकडे निघाले होते. इतक्यात समोरुन वीस पंचवीस गोरे शिपाई-स्वार आले. त्यांनी या कोवळया मुलांवर सरळ बंदुका झाडल्या. गोळयांमुळे घोडे आणि स्वार असलेल्या शहजाद्यांच्या शरिरांची चाळण झाली आणि ते धुळीत रक्ताच्या थारोळयात पडले. गोरे शिपाई जवळ आले. तेव्हा दोन शहजादे मेले आहेत आणि एक जिवंत असल्याचे त्यांना दिसले. त्याला कुठेही जखम झाली नव्हती. फक्त घोडयावरुन पडल्यामुळे कुठे कुठे खरचटले होते आणि तो भीतीने बेशुद्ध पडला होता. एका शिपायाने त्याला उभे केले आणि घोडयाच्या लगामाने त्याचे हात बांधले व दोन शिपायांबरोबर गो-यांच्या छावणीत पाठवून दिले. पहाडावरच्या छावणीत गो-यांचे काही काळे शिपाई देखील होते. कैद करुन आणलेला मुलगा बादशहाचा नातू नसीर-उल्-मुल्क आहे हे कळताच गो-या फौजेच्या साहेबाला फार आनंद झाला आणि त्याने शहजाद्याची नीट व्यवस्था करण्याचा हुकूम दिला.

× × ×

गो-यांनी बंड मोडून काढले आणि बंड करणारे हिन्दुस्तानी शिपाई

माघार घेऊ लागले. तेव्हाच गो-या सैन्याने दिल्ली शहरावर हल्ला चढवला. बहादुरशहा ज़फरना हुमायूनच्या मकब-यात अटक करण्यात आली. तैमूर लंगाच्या वंशाचा शेवटचा दिवा विझला. राजघराण्यातल्या, कुलीन स्त्रिया देशोधडीला लागल्या. मुलांसमोर बापांना ठार केले जाऊ लागले आणि आपल्या तरण्याताठ्या मुलांची कत्तल पाहून आयांनी केलेल्या आक्रोशाने आसमंत भरुन जाऊ लागला.

या वेळी पहाडावरच्या छावणीत मिर्झा नसीर उल् मुल्क दोरखंडाने बांधलेल्या अवस्थेत बसला होता. इतक्यात एक पठाण शिपाई धावत आला आणि म्हणाला, "तुम्हाला सोडून द्यायची परवानगी मी साहेबाकडून मिळवली आहे. आता दुस-या कुठल्या संकटात पुन्हा सापडायच्या आधीच ताबडतोब पळून जा."

बिचा-या मिर्झाला पायी चालणे काय ठाऊक! काय करावे ते त्याला सुचेना. पण जीव वाचवण्यासाठी कोण काय करत नाही? पठाणाला धन्यवाद देऊन तो निघाला आणि जंगलाच्या दिशेने चालू लागला. कुठे जायचे तेही त्याला ठाऊक नव्हते. एक मैलभर चालला असेल नसेल तोवर त्याचे पाय रक्तबंबाळ झाले, तोंड कोरडे पडले आणि प्राण कंठाशी गोळा झाले. थकून तो एका झाडाखाली कोलमडून पडला. आकाशाकडे पाहात तो म्हणाला "अल्ला, कसल्या संकटात ढकललं आहेस? मी आता कुठे जाऊ?" इतक्यात त्याची नजर वर झाडावर गेली. पारव्याची एक मादी आपल्या घरट्यात अंडी उबवत बसली होती. तिचे स्वातंत्र्य आणि सुख याचा शहजाद्याला फार हेवा वाटला आणि तो म्हणाला "पारव्या माझ्या-पेक्षा तू लाखपटीने बरा. कसा आरामात आपल्या घरट्यात निश्चित बसाला आहेस. मला तर जमीन आणि आकाश-कुठेच स्थान नाही."

# मिर्झा दिलदार शाह

मिर्झा दिलदार शाह, नेहमी बादशहा बहादुर शाह जफर यांच्याविषयी सांगत असत. बहादुर शहांचा मुलगा मिर्झा मुगल आणि इतर राजपुत्रं ब्रिटिशांच्या गोळयांना बळी पडले. त्यांची शिरे धडावेगळी करुन एका थाळीत घालून बहादुर शहांकडे पाठवण्यात आली. बादशहा ते पाहताच काहीशा बेफिकिरीने म्हणाले, "ही सगळी अल्लाची कृपा. यशवंत होऊन माझी मुले माघारी आली. याच दिवसासाठी सच्चे वीर आपल्या मुलांचे पालन-पोषण करतात."

कुणी विचारले "जनाब, बंडाच्या वेळी तुमचे वय काय असेल ?" मिर्झा दिलदार शहांनी सांगितले, "असेल चौदा पंधरा वर्षाचे. मला सर्व काही चांगले आठवते. माझे वडील आम्हा सर्वांना घेऊन गाझियाबादला जात होते. हिंडन नदीवर गो-या फौजेने आम्हाला पकडले. माझी आई आणि धाकटी बहीण जारजोरात रडू लागल्या. माझ्या वडिलांनी त्यांना कसेबसे गप्प केले आणि शिपायांचा डोळा चुकवून एका शिपायाची तलवार हिसकावून घेतली. त्यांनी तलवार घेताक्षणीच सर्व शिपाई त्यांच्यावर तुटून पडले. माझ्या बाबांनी दोन-चार शिपायांना जखमी केले. पण इतक्या शिपायांसमोर त्यांचा एकटयाचा निभाव लागला नाही. त्यांच्यावर तलवारीचे इतके घाव बसले की त्यांचे तुकडे तुकडे झाले.

त्यांना मारुन टाकल्यावर शिपायांनी माझ्या आईचे आणि बहिणीचे कान कापले आणि त्यांच्या अंगावर जे काही दागदागिने होते तेही त्यांनी ओरबाडून घेतले. त्यांनी मला कैद केले आणि मला घेऊन ते निघाले.

त्यावेळी माझ्या आईने आकाश भेदून जाईल असा आक्रोश केला. तो अजूनही आठवतो. एक हात छातीवर ठेवून माझी आई ओरडत होती. 'अरे माझ्या पोराला सोडा. तुम्ही माझ्या नव-याला मारुन टाकलेत. आता या अनाथ मुलावर तरी दया करा. मी विधवा याच्या आधाराशिवाय वैधव्याचे दिवस कसे घालवीन ? अल्ला, माझे काळीज फाटून जाईल हो. माझ्या

बछड्याला नेऊ नका. अरे कुणी अकबर आणि शहाजहाँला कबरीतून उठवा आणि त्यांच्या घराण्यातल्या या सेबलेवर काय संकट कोसळले आहे ते सांगा. पहा हो, माझ्या पोटच्या गोळ्याचे कसे हालहाल करताहेत: धावा हो धावा. कुणी माझे मूल मला परत द्या."

माझी धाकटी बहीण 'आका भाई' (दादा) असे ओरडत माझ्याकडे धावली. पण शिपाई घोड्यावर स्वार होऊन निघाले. त्यांनी मला दोर-खंडाला बांधून आपल्याबरोबर चालवले घोडे धावायला लागले की मलाही धावावे लागत असे. धावून धावून माझे पाय रक्तबंबाळ झाले होते. दमछाक होऊन प्राण कंठाशी येत होते."

कुणी विचारले, "मग तुमच्या आईचे आणि बहिणीचे काय झाले ?" मिर्झा म्हणाले, "आजवर मला त्यांचा काहीच पत्ता नाही. त्यांच्यावर काय प्रसंग ओढवले कशाचीच काही खबरबात नाही. मला शिपाई दिल्लीला घेऊन गेले. तिथून इंदूरला घेऊन गेले. घोड्यांना खरारा करणे, त्यांची लीद साफ करणे अशी कामे ते माझ्याकडून करवून घेत असत."

# मिर्झा कमर सुलतान

दिल्लीच्या जामा मशिदीकडून जो रस्ता मटिया महाल आणि चितली कबर वरुन दिल्ली दरवाजाकडे गेला आहे तिथे एक भाग 'कल्लू खवास की हवेली' या नावाने प्रसिद्ध आहे. या वस्तीतून रोज अंधार पडल्यावर एक फकीर बाहेर येतो आणि जामा मशिदीपर्यंत जातो. मग तिथून परत फिरतो.

फकिराची शरीरयष्टी भरपूर उंच परंतु किडकिडीत आहे. दाढी काळी पांढरी आहे आणि गालफडे बसली आहेत. त्याच्या पायातल्या जोडयांच्या फाटून चिंध्या झाल्या आहेत. कुडता अतिशय मळलेला आहे आणि त्याला दहाबारा ठिगळे लावलेली आहेत. डोक्यावरचे केस वाढून त्यांच्या जटा झाल्या आहेत. त्याच्या डोक्यावर एक फाटकी टोपीदेखील आहे. त्याच्या एका हातात एक लांब बांबू आणि दुस-या हातात एक मातीचा कटोरा आहे. कटो-याची एक कडदेखील फुटली आहे. त्याचा चेहरा इतका पिवळा पडला आहे की एकतर तो बऱ्याच मोठया आजारातून उठला असावा किंवा 'चांडू' पीत असावा असे पाहाणा-याला वाटते. चालताना तो उजवा पाय ओढत चालतो. कदाचित पूर्वी त्याला अर्धांगवायू झाला असावा.

त्याचा आवाज अतिशय खडा आणि व्याकुळ आहे "अल्ला, एक पैशाचा आटा दे. तूच दाता" असे तो अतिशय व्याकुळ स्वरात ओरडतो तेव्हा बाजारातल्या आणि आसपासच्या घरात राहाणा-या लोकांवर त्याचा आपोआप परिणाम होतो. मात्र, हा फकीर कोण आहे, त्याच्या आवाजात इतके दुःख का आहे हे दोनचार माणसे वगळता कुणालाच ठाऊक नाही. आसपासच्या घरातल्या कितीतरी बायका म्हणतात "जरा दिवेलागण नाही झाली की याचा भेसूर आवाज यायला लागतो. कसेसेच होते याचा आवाज ऐकला की. कोण कुठला फकीर आहे कुणास ठाऊक. दिवसा याचा आवाज कधी येत नाही. रात्रीच तेवढा भीक मागतो."

फकीर रोज कल्लू ख्वासच्या हवेलीतून बाजारात येतो, आणि तशाच संथ चालीने उजवा पाय ओढत, काठी ठेकत, फाटक्या जोडयांनी धूळ उडवत जामा मशिदीकडे जातो. वारंवार त्याच्या तोंडून एकच हाक येते "अल्ला, एक पैशाचा आटा दे."

हा फकीर कुठल्याही माणसासमोर किंवा दुकाना समोर थांबत नाही सरळ चालत राहतो, जर कुणा वाटमरूला किंवा दुकानदाराला दया आली आणि त्याने त्याच्या कटोयात एखादा पैसा किंवा इतर काही खाद्यपदार्थ टाकला तर फकीर, "भले होवो तुमचे बाबा, अल्ला तुम्हाल कधी वाईट दिवस न दाखवो." एवढेच म्हणून पुढे चालयला लगतो तो आंधळा असल्यामुळे, त्याल भीक घालणारा कोण आहे ते त्याला दिसत नाही.

जामा मशिदीतून परत जातानादेखील तो असाच ओरडत कल्लू ख्वासच्या हवेलीत जातो या हवेलीत गरीब मुसलमानांची बरीचशी लहान-लहान घरे आहेत, त्यातच या फकिराचे अगदी लहानसे पडके असे घर आहे. या घरात फक्त एक ओसरी, एक लहानशी खोली, एक संडास आणि अगदी लहानसे आंगण आहे. ओसरीवर एक मोडकी खाट आहे अणि खाली फरशीवर एक फाटके कांबळे आहे.

हा फकीर कोण आहे हे बहुतेक कुणालाच ठाऊक नाही. फक्त दोन-चार जणानाच, हा बादशहा बहादुरशहा जफर यांचा नातू आहे आणि याचे नाव मिर्झा कमर सुलतान आहे हे ठाऊक आहे. हा बंडापूर्वी देखणाबांड जवान होना. संपूर्ण लाल किल्लयात याच्या देखणेपणाचा खूप बोलबाला होता घोडयावर स्वार होऊन तो निघत असे तेव्हा किल्ल्यातल्या स्त्रिया आणि बाजारातली माणसे रस्त्यात थांबून त्याच्या रूपाकडे एकटक बघत असत. येणारे जाणारे वाकवाकून मुजरे करत असत.

कुणी विचारले, "मिर्झा, तुम्ही दिवसा बाहेर का येत नाही?" शहजादा कमर सुलतानने उत्तर दिले ? " ज्या बाजारांमधे माझ्या रुपाचा आणी देखणेपणाचा एवढा गवगवा होता, त्या बाजारात त्याला आशा अवस्थेत जायची लाज वाटते. म्हणून रात्रीच बाहेर पडतो आणि केवळ परमेश्वराकडेच मागतो, त्याच्या पुढेच हात पसरतो."

मग कुणी विचारले. "मिर्झा, तुम्हाला अफूचे व्यसन तर नाही ना ?" यावर शहजादा म्हणाले "होय वाईट संगतीमुळे अफूचं व्यसन तर लागलं आहेच,

शिवाय कधी कधी चांडू[1] देखील पितो."

मग कुणी म्हणाले "बंडापासून आजपर्यंत तुमच्यावर काय काय प्रसंग ओढवले ते तरी सांगा." यावर कमर सुलतान एक निश्वास टाकून गप्प झाले. मग ब-याच वेळाने म्हणाले, "काय सांगू ? एक स्वप्न पाहात होतो तेवढयात झोप मोडली तेंव्हा पासून जागाच आहे. ते स्वप्न पुन्हा कधी पडलं नाही आणि ते यापुढे कधी दिसेल याचीही आशा नाही."

1 चांडू - अफूचा अर्क, Heroin